द्विपरदशन् = विअअरअह = बारह = बारा
त्र्यपरदशन् = तिअअरअह = तेरह = तेरा
पञ्चापरदशन् = पंञाअरअह = पंण्णाराह = पंण्णरा = पन्हरा = पधरा
षडपरदशन् = सळअळअह = सोळह = सोळा
सप्तापरदशन् = सत्ताअरअह = सत्तरह = सतरा
अष्टापरदशन् = अट्ठाअरअह = अट्ठारह = अठारा = अठरा

येणेंप्रमाणें अकरा बारा, तेरा, पंधरा सोळा सतरा अठरा ह्या शब्दांतील र चा उगम पूर्ववैदिक मार्गत व त्या पूर्ववैदिक भाषेच्या अपभ्रंशांत आहे

दोन शब्दांचा समास होतांना कोठें कोठें प्रथम शब्दाच्या अन्त्यस्वराला वैदिक १ ] भा`त दीर्घस्व येतें जसें, मित्र + वरुणः = मित्रावरुणौ येथें पाणिनि एवढें च सांगेल कीं समास होतांना कित्येक सामासिक शब्दांत असा दीर्घत्वाचा चमत्कार होतो हा चमत्कार कां होतो, तें पाणिनि सांगणार नाहीं व तें सांगण्याचें त्याचें काम हि नव्हतें तो कांहीं व्याकरणाचा इतिहास लिहीत नव्हता

*मित्र + अ + वरुण = मित्रावरुणौ*

या समासांतील अ चा अर्थ काय ? माझ्या मतें ह्या द्वंद्व–समासांतील अ चा अर्थ आधिक्य Addition असा आहे अ हें अक्षर पूर्ववैदिक अपर ह्या शब्दाचा अपभ्रंश किंवा संक्षेप आहे द्वंद्व–समास म्हणजे दोन अथवा अधिक शब्दांची मिळवणी

मित्रेण अपरः नाम अधिकः वरुणः = मित्रावरुणौ =

वरुण Together with *मित्र* = वरुण and *मित्र*

---

२०] **(२) विंशति**

द्विदशति = विअशति = विंशति

पूर्ववैदिक भाषेंत दशन् प्रमाणें दशति हा शब्द १० दहा या अर्थी होता द्विदशति म्हणजे दोन दहा द्विदशति या पूर्ववैदिक शब्दाचा अपभ्रंश विंशति द्वि मधला प्रथम द काढून टाकला आहे व दशति मधील प्रथम द च्या बदला अनुस्वार उभारला आहे कित्येक भाषाशास्त्रज्ञ शति, शत या शब्दाचा अर्थ पूर्ववैदिक काळीं दहा होता, असें प्रतिपादन करतात परंतु तें असामंजस्यास्तव मला पटत नाहीं

त्रिदशाति = त्रिअशाति = त्रिंशाति = त्रिंशत्

चत्वारिदशाति = चत्वारिअशाति = चत्वारिंशत

पंचदशाति = पंचअशाति = पंचाशत

पच या शब्दांत अन्त्य अ असल्यामुळे द् चा लोप होऊन तत्स्थानीं अनुस्वार झाला नाहीं.

पष्ठशाति = पष्षटि = षष्टि

दोन ष झाल्यामुळे एकाचा लोप षष्टि म्हणजे सहा दहा

सप्तदशाति = सप्तअशाति = सप्तति

अष्टदशाति = अषअअति = अषीति = अशीति

मधल्या अ बद्दल ई व ष बद्दल श [१०

पूर्ववैदिक अष्टदशाति चा वैदिक अपभ्रंश अशीति.

किंवा

अष्, अश् असा हि आठ ह्या अर्थी पूर्ववैदिक शब्द असावा.

नवदशाति = नवअति = नवति

संस्कृत = मराठी

विंशति = वीस

त्रिंशत् = तीस

चत्वारिंशत् = चाळीस

पंचाशत् = पंनास

षष्टि = साटि = साठ [२०

पण

सप्तति = सत्तर

सप्तति चे सत्तर कसें व्हावें ? र् कोठून आला ? प्राकृतवैयाकरण सप्तति चें सत्तरि असे रूप निपाततात इतके च कारण देत नाहीत. स चा स रहातो प्त चा त्त होतो. पण ति ची रि कशी व्हावी. ति चा इ होईल, रि कोणत्या हि समजस नियमानें होणार नाही. सप्तति चा अपभ्रंश होताना ति ची रि होते, असे म्हणणे म्हणजे कांहीं नियम सागणें नव्हे, व कारण हि देणें नव्हे. अनेक वस्तूच्या ठाई जो येक सामान्य धर्म

रहातो त्याचें कथन करणें म्हणजे नियम सांगणें तसा प्रकार सप्तति या अपभ्रंश सत्तरि होतो हें सांगतांना झालेला दिसत नाही तेव्हां, मराठी सत्तर याचा उगम संस्कृत सप्तति शब्दांत नाहीं मला वाटतें, पूर्ववैदिक भाषेंत सात या अर्थी सप्तृ असा शब्द असावा

सप्तृदशाति = सत्तरअआइ = सत्तरि = सत्तर

अशा दृष्टीनें पाहिलें असतां, आपल्या पूर्ववैदिक कोशांत सप्तृ हा शब्द गणावा लागतो अन्यथा मराठी सत्तर शब्दाची यथाशास्त्र व्युत्पत्ति होत नाहीं

वि का राजवाडे

## १४ चौधरी

१०] हा शब्द चक्रधारी या संस्कृत शब्दापासून निघालेला आहे चक्र म्हणजे पांच चार गांवांचा समूह त्यांचें काम चालणारा जो तो चक्रधारी

चक्रधारी = चक्करधारी = चअरधारी = चवधारी = चौधारी = चौधरी

चक्र म्हणजे व्यापाऱ्यांचा वगैरे संघ त्यांचा जो मुख्य तो हि चौधरी या शब्दानें म्हणजे चक्रधारी या शब्दानें ओळखला जात असे व जातो

चौधरी हा शब्द हिंदी, बंगाली, गुजराथी वगैरे गौड भाषांत आहे

धतुर्धर असें एक विशेषनाम एका ग्रंथकाराचें (उदा नीलकंठ चतुर्धर) सापेक्षतः बऱ्याच अर्वाचीन ग्रंथकाराचें आहे हा चतुधर शब्द संस्कृत नाहीं चौधरी या भाषा शब्दाचें संस्कृतीकरण करून हा चतुधर शब्द बनविलेला आहे तेव्हां हा चतुधर शब्दाकडे विशेष लक्ष देणें नलगे चौधारी हा उच्चार अहिराणींत अद्याप ऐकूं येतो

२०] वि का राजवाडे

---

## १५ जुनें वैद्यक—मराठी पोथी

१ ही पोथी चेवल्यास मिळाली पार्थापीं पानें ११३ वर असावीं पैकीं फक्त ९ पानें उपलब्ध आहेत अक्षरांचें वळण शालिवाहनाच्या चौदाव्या शतकांतील आहे सांपडलेलीं पानें ५९ पासून ६६ पर्यंत आठ व १२३ वें पान मिळून नऊ हा

पृष्ठास ओळी ११, दर पानास ओळी २२, मिळून एकंदर ओळी १९८ आहेत. एका ठिकाणी पृष्टमात्रा आलेली आहे (पान ५९ पाठ, ओळ १).

२ संस्कृत श्लोक व त्याचें मराठी भाषान्तर, असा क्रम आहे. हारीत, सुश्रुत, गलंड, वृंद, भेड, हरिमेखल, इतक्या ६ पुरातन संहिताकाराची नावें ह्या नऊ पानांत आलेली आहेत. संस्कृत फार अशुद्ध लिहिलें आहे. संहितांतील पाठ ताडून पहाण्यास हे श्लोक अशुद्ध असले तरी उपयोगी पडतील. हरिमेखल वगैरेंच्या संहिता तर सध्या केवळ नाममात्रानें हि श्रुत असतील नसतील त्यांतील एखादा हि श्लोक किंवा वचन मिळल्यास तज्ज्ञास आनंद होणार आहे. हा ह्या पोथीतील पहिला विशेष.

३ ह्या पोथीतील मराठी ज्ञानेश्वरकालीन भाषेतलें आहे. हा या पोथीचा दुसरा विशेष. [१०

## पृष्ठ ५९ पोट

(१) ॥ ८२ ॥ गुळवे : पापडा : मोथा : काराईते : सुंठि : वातपित
(२) ज्वरि : काढा दिजे : समे ॥ पंचरुद्र ॥ छ ॥ मूस्ता मारग्वधोशीरः
(३) हरिद्रा दारुसाह्वय : पटोलं पिचूमद् च : यष्टिमधूकमेव च
(४) ॥ ८३ यककषाय सिद्ध स्या : द्वातपितज्वरोद्भवं ॥ छ ॥ मो
(५) था बाहावा : वाळा : दारुहळदि : पटोलि : कडूनिंबु : जेष्टिम
(६) धु : काढा वातपितज्वरु समे ॥ मूस्तादि ॥ निळोत्पळमूशीरा
(७) णि : बळा पद्मकमेव च : कार्श्मरि मधूक द्राक्षा : मधूका
(८) नि परुषक ॥ ८४ ॥ पेय शीतकषायोय : वातपितज्वरापह :
(९) सप्रळाप समोहं च शमयेत्पैतिकं ज्वर ॥ ८५ ॥ निळोत्पळें : [२०
(१०) वाळा चिकणा : पद्मकु : सिवनिं : जेष्टिमधू : द्राक्षा महुवें :
(११) फणंस : काढा शितळु दिजे : वातपितज्वरु शमे ॥ छ ॥ के

## पृष्ठ ५९ पाठ

(१) वळ पितज्वरु हि समे ॥ छ ॥ प्रसृतो द्वौ मसूराणां । मूर्वामधूक
(२) चंदन : शारिवोशीरमृद्वीका : परुषकफळोत्पळं ॥ ८६ ॥ पटोळ
(३) पिचूमंदं च : शीतपाकि तथाशन : पक्वांतछर्करा क्षौद्रयुक्तं पी
(४) तानिळाज्वरे ॥ ८७ ॥ पटोलि कडूनिंबु : गाडे चिकणा : काढा मधु

( ५ ) सापरोसिँ दिमें ः वातपित्तज्वर समे ॥ ७ ॥ पर्मुरोशीरमृद्विका ः
( ६ ) पद्मर्क पद्मकेशरं ः धात्रि परुषक ध्यात्रि· बला मधूकपद्नं ॥
( ७ ) ८८ ॥ मधूकपुष्पकाश्मर्यापः शीतपाकिफलं तथा पद्मपपुनि
( ८ ) तं रात्रौ स्थितं मृद्भाजने नवे ॥ ८९ ॥ लाजाचूर्णं मतिवापं ः श
( ९ ) करामधूसंपुतं जातिपुष्पाधिवासंतु पिबेत्तृर्छार्दिमूर्छितं ॥ ९० ॥
(१०) दाहभ्रममदारोवातपीतज्वरं पीत्वा निवृतिमाप्नोति ध्रिम
(११) गृहमिर्पावुमि ॥ ९१ ॥ उत्ततिया पाळा ः द्राक्षा ः पद्मकु निरोल्प

## पृष्ठ ६० पोट

( १ ) ळं ः आवळकरिया ः परुषक ः रिंगणि ः चीकणां ः जेठीमधू ः चंद
१०]( २ ) न ः महुवें ः शीवनि ः गाहे धामाणि ः र्ची फळें समभागें करूनु ः नवि
( ३ ) ये मांडा रात्रि निवों दिजे तांदुळां घिया लाया ः आणि सापरमधू ः
( ४ ) फाई घियां फुलां चा वासु देऊनु पाजिजे ः सहान उंफकारे ः मछा दा
( ५ ) हो ः भ्रमू ः मदू वातपित्तज्वर ः फगि ः आतुर यां शांति करिं ः जैसें ज
( ६ ) ळतेया घरां उदक ॥ हरिताम् ॥ ७ ॥ मुद्गामलकचूर्णानि ः मधु
( ७ ) कानि घृतेन तु अंधुकाजिपयुक्तानि ः प्रदाह नाहनाशनं ॥ ९२ ॥
( ८ ) मुगां आवळियां चं चूण ः तुपं काल्विज जैसा पिंडू होय ः ता कां
( ९ ) शिर्ष पाणिये कालउनु दिजे ः दाहो शमे ॥ ७ ॥ दधिर्द्ध दाडि
(१०) मं रोधं ः विदारिबिजपुरकं ः शिरप्रदेश लेधें मृष्णादाहनिवा
(११) रण ॥ ९३ ॥ कविठ दाडिम गेय भूइकोहळे ः मा[illegible]िंग ः गा

२०]

## पृष्ठ ६० पाठ

( १ ) णीयें वाटूनु ः माथा लेपु दिजे ः साहान दाहो समे ॥ भेडात् ॥ इति वा
( २ ) तपित्तज्वर ॥ ७ ॥ स्तैमित्यसर्वांगविमर्दनं ः शिरोव्यथा हीमध्ये
( ३ ) वगुरुत्वकामत्वकसनं निद्रास्यो ः मनितापज्वरा ककानिद्रा स्यां
( ४ ) मिति ः शास्रमानितं ॥ ९४ ॥ सर्वांगी व्यथा जडत्व ः शिरव्यथा ः हि
( ५ ) व पामू ः कायू ः निद्रा ः पडिसी ः मातुमंदु मैदु ः व्हातु ः आरसु हिं
( ६ ) लक्षणिं वातश्लेष्मज्वर जाणावा ॥ ७ ॥ मुस्ता नागरभूनिंबः गु
( ७ ) डुचिमूलकंफलं ः कषायं पचमामे च्यो ज्वरविनाशनं ॥ ९५ ॥ मु
( ८ ) ठि चिगाइनं गुरवें ः मोथा गमगानं गट्टी [illegible] ः [illegible]

( ९ ) कु ज्वरु पचे ॥ छ ॥ किराततिक्तक मुस्तं : गुडूचिविश्वभेषजं : पाटा
(१०) मूशीरसोद्दिच्य पीबेद्वातज्वरशातये ॥ ९६ ॥ चीराईते : कडई :
(११) मोथा : गुळवे सुठी : पाहाडवाळा : काळा वाळा : कढूनु दिजे :

## पृष्ठ ६१ पोट

( १ ) पाचन होऐ ॥ छ ॥ पर्परभृष्ट पटुछित : काजिकसिक्तो हि वालुका
( २ ) स्वदृश स्वदस : मयाति : वातकफामया मस्तकशूळांगभंगा
( ३ ) दि च ॥ ९७ ॥ पापरि वाळु ताविजे : ते वाळु येक वस्त्र आथुरुनु त्या
( ४ ) वरि येरडपाने घालुनुं : वरि रिचविजे : काजिये सीपौनु पोटाळि
( ५ ) या किजाति : तेणें सेकिजे तेणे मस्तकसुळ : मुष्य : सर्वांगीचें दु
( ६ ) पणे सामि : वतश्लेष्मिकु दोपु शमे ॥ वाळुकास्वेदु ॥ श्रोतसां [१०
( ७ ) मर्द्धनं नुत्वा नित्वा पचकमाशय : हत्वा वातकफघ्न तं : स्वेदो ज्व
( ८ ) रमपोहति ॥ ९८ ॥ येरडेलें मापुनुं : सगडिया अथवा ईटा सर्वा
( ९ ) ग सेपीजे : जव घामु ये : तेणे हि वातश्लेष्मकु ज्वरु समे ॥ छ ॥ मा
(१०) तुळगफळ केशरोधृत : सिधूजन्ममरिचानी तो मुखे हति
(११) वातकफरोगमघागशोषमाशू जडतामरोचकं ॥ ९९ ॥ मातुळि

## पृष्ठ ६१ पाठ

( १ ) गाचि चूडि: सैंधवमिरियें मुषि धरिता निर्गीवनें : वातकफरोग
( २ ) अरोचक शमे ॥ छ ॥ पीप्पलि पीप्पलिमूळ : चव्यचीत्रकनागरै:
( ३ ) दिपनिय स्मृतो वर्ग : कफनिळागदापह ॥ १०० ॥ पीपळिया पी
( ४ ) पळमूळ : चविचीत्रकु सुठि : काढा दिजे : कफवातज्वरु शमे ॥ [२०
( ५ ) हा पंचकोळु ॥ आरग्वधग्रथिकमूस्तातिक्ताहरीतकीभि क्वथि
( ६ ) त कषाय समे शशूळे कफवातयुक्ते : ज्वरे हिते दिपन पाचन श्च :
( ७ ) ॥ १ ॥ बाहावेया चे सेंगे चा मो टाक २ पीपळिमुळ टांक २ मूस्ता टांक
( ८ ) २ केदारकुडि टाक २ काढा अष्टाविशेषु किजे दिजे :
( ९ ) सामू ज्वरु शुळु : कफवातरोग समति ॥ बाहावापचकु ॥ पीप्प
(१०) लिभि श्रृतं तोय मनभिष्यदि दीपनं वातश्लेष्म विकाराघ्नं : प्लिहघ्नं
(११) ज्वरनाशन ॥ २ ॥ टांक १० पीपळिया पाणिं सेर २ आतु कढिजे पाई

## पृष्ठ ६२ पोट

( १ ) सह १ दिजे : वातश्लेष्मविकार धामू झिहा ज्वर शमे ॥ ७ ॥ मुस्ता
( २ ) पपटदुस्पर्शागुडूचिविश्वजं जलं कफवातरुचिछर्दिदाहशो
( ३ ) पज्वरापहं ॥ ३ ॥ मोथा : पापडा दुरालभा : गुळवे : सुंठि काढा क
( ४ ) फ अरुचि : छर्दि : दाहो शमि ॥ ७ ॥ मुस्तापर्पक ॥ द्राक्षमुस्तिष्ठं पे
( ५ ) यं : कषायुफककफानिळे : अविपाकेतिनिद्रायां : पार्श्वरुक्श्वास
( ६ ) कासके ॥ ४ ॥ द्राक्षमुस्ता या काढा पीपळि मतिपाकेर्सी दिजे : क
( ७ ) फवातज्वर : अपकु अतिनिद्रा : पार्श्वशूळु स्वासु कासु शमे ॥ ७ ॥
( ८ ) निदिग्धीकामृताशुंठि : पुष्कराह्वे श्रुतं पचेत् । कामकासरुचि
१०]( ९ ) श्वासकफवातज्वरापहं ॥ ५ ॥ रिंगणि : गुळवे : सुंठि : कोष्ट : का
(१०) ढा स्वप्नादि दिजे : वातकफु शमे ॥ ७ ॥ दारुपर्पटकं मुस्तं : मम
(११) ( धा ) विश्वमेपजं : भुनिंबकटुक मार्गी फुस्तुम्बुरुसमांशक ॥ ६

## पृष्ठ ६२ पाठ

( १ ) ॥ फ काथ पिबे हि मं मधुयुक्त ज्वरापहं : वातश्लेष्माणि कासे च :
( २ ) कंटरोगे गळग्रहे ॥७॥ देवदारु : पापडा मोथा : हिरडा सुंठि : भुनिंबु :
( ३ ) कटुकळ : मार्गी : कोथुंबिरि : सममार्गे काढा मधसि दिजे : वातश्ले
( ४ ) ष्मज्वर कासु कंठावरोधु : गळग्रहो हे शमति ॥ ७ ॥ हरितान् ॥
( ५ ) कंठावरोधा चिकित्सा ॥ कटूफळ इंद्रजव : काकडासिंगी : क
( ६ ) टूकि पींपळि : गजपिंपळि मारांगी मरता : सुंठि : वेपड : पींपळी
२०] ( ७ ) मूळ : हिरडा : चित्राईतें : कचेरा : पाहाड सेउगा धामासाअ :
( ८ ) पगोळि : जिरें : गुळवे : ईशार्थ काढ : साधू ज्वर धापः पोष्क
( ९ ) रावा समे ॥ ७ ॥ कटूफळादिकाथु ॥ ९ ॥ कटूफळा पुष्करा अ
(१०) ब्दकटूकाः पाठावपाककटैः पथ्या–धान्य–सुरद्रुजेपभकाणां
(११) रोगीसर्गातिनके : मार्गीजीरककमूर्णं । ज्वनिगझमाप

## पृष्ठ ६३ पोट

( १ ) न्तोर्य हरेत् : कासं वातकफज्वरो गतिशिरोजाड्यं महिपार्दक
( २ ) ॥ १ ॥ कटूफळ कोष्ट मोथा कडागदाई : पाहाड वेर्षं पापडा : को

( ३ ) थूचुरि : देवदारु : ईद्रजव सुठि : पीपळी काकडसिंगी : कचोरा :
( ४ ) कीराईतें : भारागी जीरें : रोईसाचें फळ : अष्टाविशेष पचिजे : प्रति
( ५ ) पाकु हिगु : आळेरसु ॥ बहिरत्व शीरव्यथा : हिंव कंठावरोधू : हे
( ६ ) रोग शमति ॥ कटूफळादि ॥ ७ ॥ ईति वातश्लेष्म : द्वंद्‌ज ॥७॥ मृदूका
( ७ ) शमोहास्यविलेपतिक्ता क्षयो विदाहो रुचिशैल्यतद्रा : नेत्रद्वये
( ८ ) तसमश्मृन्यसकुळा : स्वेदोपि गात्रे कफपितजे ज्वरे ॥ ८ ॥ तृषा
( ९ ) काशू : दुचितपण : तोंड तिळितिळित : मुष कडू होऐ : क्षणी चट
(१०) चटि : अरुचि स्वाशू : सैत्य तद्रि : डोळे धडधडिता गळति : आ
(११) +++++ मेजे : ईहि लक्षणि : पीतश्लेष्मीकु ज्वरु जाणीजे ॥ ७ ॥

## पृष्ट ६३ पाठ

[१०

( १ ) + + + + + + + + पर्पटक्काथमधुयुतं पिबेत् ॥ द्राक्षापटोळभू
( २ ) निंब : क्काथ पाचन उच्यते ॥ ९ ॥ सर्वद्वारेषु सम्यत यथादोष वपु
( ३ ) ति ॥ ७ ॥ दुराळभा : पापडा : काढा मधू प्रतिपाके दिजे ॥ तथा द्राक्षा
( ४ ) पटोळा : भूनिंबु : काढा मधें दिजे पाचन सर्व ज्वरि होऐ ॥ ७ ॥ सुश्रू
( ५ ) तात् ॥ कटकार्यामृताभेर्गी : नागेरद्रजवासक : भूनिंषचंदन श
( ६ ) स्त : पटोळ कटुरोहिणिं ॥ १० ॥ कषायं पयये देयं : पितश्लेष्मज्व
( ७ ) रापह : दाहतृष्णा रुचिछर्दिकासहृत्पार्श्वशूळजित् ॥ ११ ॥ रिं
( ८ ) गणि गुळवे : भारागि : सुठि : ईद्रजव दुराळभा : भूनिंबु चद्‌न :
( ९ ) पटोळि कटुरोहिणि : काढा द्‌जि : दाहो : तन्ह : अरुचि उ्कारि :
(१०) सहित पितश्लेष्मु ज्वरु समे ॥ ७ ॥ गुडूचिनिंबधान्यक : चद्‌ [२०
(११) न पद्मकारिणा : येष सर्वज्वरान् हति : गुडूच्यादिशू दिपनं ॥ १२

## पृष्ट ६४ पोट

( १ ) गुळवे : भूनिंबु : धणे : पद्मकु : चद्‌न काढा दिजे : सर्व ज्वर सम
( २ ) ति ॥ ७ ॥ गुडूंच्यादि ॥ पटोळ चद्‌न मुर्वा : पाटा तिक्तामृतागणा :पी
( ३ ) तश्लेष्मज्वरछर्दि : दाहकपविषापह ॥ १३ ॥ पटोळि चद्‌न : महुर
( ४ ) सि : पाहाड : कडूई : गुळवे : काढा दिजे : पीतश्लेष्मीकु ज्वरु उ्का
( ५ ) रे दाहो कपु विष हें शमे ॥ ७ ॥ सपत्रपुष्पवासाया : रक्षाक्षौद्रासि

[

( ६ ) तायुतः कफपितज्वर हंती ः साम्रपितां सकामळ ॥ १४ ॥ आट्रूक्सि
( ७ ) पाषेयां पानां फुलां चा रस् ः मधूसातरोसिं दिजे ः कफपितज्वर र
( ८ ) कपित कामळ हे रोग शमति ॥ ७ ॥ सशकरामाम्रकदुकामूष्ण
( ९ ) वारिणां पीत्वा ज्वर जये जंतु ः कफपितसमुद्भवं ॥ १४ ॥ केदारकु
(१०) डी ः उन्हवणियें घादूनु ः त्यांतु साषर टांक ५ घालुनु दिजे ः क
(११) फपितज्वरु समे ॥ ७ ॥ पटोळ पीचूमंदं च ः त्रिफळा मधूकं बळा

## पृष्ठ ६४ पाठ

( १ ) साधितोयं कषाय स्या पितश्लेष्मोद्भवे ज्वरे ॥ १५ ॥ पगोळि निंबु
( २ ) त्रिफळा ः जेष्टिमध ः चीकणां काढा दिजे ः पीतश्लेष्मज्वरु समे
१०]( ३ ) ॥ ७ ॥ शम्याकशंघरीराष्णां त्रिफळा आटरूषकें ः येककषाय
( ४ ) सिध स्या ः पितश्लेष्मोद्भवे ज्वरे ॥ १६ ॥ वाहावा सविरि राष्णा भ्रक
( ५ ) ळा ः आडूळ्सा ः काढा दिजे ः पीतश्लेष्मज्वरु समे ॥ ७ ॥ त्रायंति
( ६ ) कटुका मूस्ता चदनोशीरसारिवा पगोळपद्मामधुकचास्यस
( ७ ) मीति ॥ १७ ॥ सप्तक मधना पेय ः कफपितोद्भवे ज्वरे ॥ ७ ॥ त्रायमां
( ८ ) णं ः केदार कडूई मोथा चंदन वाळा ः काउळि ः पद्माळि पद्मकु ः
( ९ ) जेष्टिमध महुवें ः सममागें काढा मधू मतिपाकेसिं दिजे ः कफ
(१०) पतिज्वरु समे ॥ ७ ॥ काश्मर्यफळ्मुद्रिका ः शीतपाकिपरुषकं ः
(११) मधूकं त्रिफळा मूस्ता चंदनोशीरपद्मकं ॥ १८ ॥ त्रायंतिकटुका

## पृष्ठ ६५ पोट

२०]( १ ) ++ यत्पाद्र चापि तत्सर्म ः पीबेत् पर्युषीतं रात्रौ मधुना श्लेष्म
( २ ) पीतानुत् ॥ १९ ॥ शीवनिंफळें ः द्राक्षा ः गाडेचिकणां ः फणस ः महु
( ३ ) वें ः त्रेफळा ः मूस्ता चंदन ः वाळा ः पद्मकु ः त्रायमाणं ः केदारकुडि ः
( ४ ) जेष्टिमधू सममागें पाणियें वादूनिं ः रात्रि नीवळ्त ठेविजे ः उ
( ५ ) द्रेक निवळि मर्ग सिंदिजे ः श्लेष्मपितज्वरु शमे ॥ ७ ॥ भेडान ॥
( ६ ) पगोळारिष्टपत्राणा साभयं कटुरोहिणिं ः हरिद्रे द्वे समाधूकं मूरी
( ७ ) रं चातुरंगुळं ॥ २० ॥ पीपेत्कषायं मधुना श्लेष्मपितज्वर सु पे ॥७॥ ह
( ८ ) रितास् ॥ पगोळि निंबाचिं पानें हीरडा ः कटूरोहिणि हळदि ः दारु
( ९ ) हळदि ः जेष्टिमधु ः वाळा वाहावा काढा मधूसिं दिजे श्लेष्मपितज्वरु

(१०) समे ॥ श्लेष्मपितज्वरा चिकित्सा ॥ छ ॥ मथावं कलुष विलाचनचुर्ग
(११) निलुस्त रक्तप्रभं तंद्रामोहविदाहसैत्ये : कशन : श्वासप्रळापं भ्रमं

## पृष्ट ६५ पाठ

( १ ) अस्तिसधीन् मूर्द्विरुकहृदय निद्राक्षय : स्वेदन : किसक्ठविकुजने श्ट
( २ ) तिभव पिता शृजे ष्टीकन ॥ १ ॥ मकत्व मुपनाशिकोप्ररसना पाक्य
( ३ ) जित्वा स्वराः स्पर्शामूत्रविशाचिराः ष्टीगलिताः स्यात्सन्निपाताज्वरपुर्णे
( ४ ) सर्वगुणे : भवेदगुणिता : नष्टनराणा . मृति किंचित् लक्षण सयुते प्रति
( ५ ) ज्वीवति कष्टे नं च ॥ २ ॥ डोळे कश्मळ गळति . लोहिवे होंतिःछायाही
( ६ ) ण दिसे : तद्रि डुचितेपण : दाहो श्वासु : सेत्य : कासु प्रळापुः भमू हाडां
(७) चिया सादि : कपाळिं उरि व्यथाः नींद्रा न ये : स्वेदु आंग तुटे :गळा घु[१०
( ८ ) रुघुरि : कानि ध्वनि उठिति : रक्तपित वमि : मुकेपण : तोंडऊढ का
( ९ ) न जिभ येथे फोड उठिति . जिभ परवड : कष्टी मळमूत्र होंति : ईहि
(१०) लक्षणि संनिपातु सपुर्ण : वरि आगी चेतना नांहिं : तो रोगीया अ
(११) साध्यु ॥ थोडि लक्षणे असति : तेया प्रतिकारु बहुतकरि वाचे का

## पृष्ट ६६ पाठ

( १ ) + + + ॥ गलेडात् ॥ लघनं वाळुकास्वेदा : नस्यनिष्टीवनं तथा : अ
( २ ) अवलेहोंजन क्राथ : प्रकुप्रायोज्य त्रिभेषजे ॥ ३ ॥ लंघन :वाळुकास्वेदु:
( ३ ) नस्यु निष्टिवन : अवलेहो : अजन : काढा परिपाठि चि त्रिदोषी कीजेती
( ४ ) ॥ छ ॥ त्रिरात्र पचरात्रं वा :सप्तरात्रमथापि वा . लघनं शनिपातेषु :कुर्या
(५) दारोग्यदर्शनात् ॥ ४ ॥ तिनि रात्रे कां पचरात्रेः कां सप्तरात्रें :कां सन्निपा[२०
( ६ ) ती जव आरोग्यता होऐ ॥ तव वरि लघन ची करावावें ॥ छ ॥ दोषाणां
( ७ ) मेहसा शक्ति : लंघन यो सहिष्णुता : न तु दोषक्षया कश्चि:त्सहते लंघन
( ८ ) दिक ॥ ५ ॥ दोषासि बळ तवं चि : जव लघन न घडे :दोषाचें नवेपण
( ९ ) वायु चा पडिभरु : लघनें शमे ॥ छ ॥ कफपितोद्भवे धातु : सहते लंघ
(१०) नं महत् : मक्षयादूर्धमपि वायु नं सहते क्षणात् ॥ ६ ॥ सर्परभृष्ट ई
(११) ती ॥ वृदात् ॥ सैधवं मरिच क्षूद्र शर्कराकुष्टमेव च : बत्समू

## पृष्ट ६६ पाठ

( १ ) त्रेण सापिष्टो : नरच तद्भिनिवारणं ॥७॥ सेधव मीरियें रिंगणेयां चा बिलु :

( २ ) रार्क्रोष्ट : वेपंड : पोकडमूर्ने : वाद्दलु : मस्यु विजे : तेद्धि निवारे ॥७॥ मे
( ३ ) हातु ॥ सैद्रिनस्यांजन ॥ क्पोपे च कोशांतकिदेवदाळि सिवेपगंथा :
( ४ ) मूहतिद्वयें च : हीर्यावळिमूलसनागवळि सर्ह्ना प्रमोघाय पर्द्रीर्दुनी
( ५ ) मरमं ॥ ८ ॥ त्रिकटुक : रानढोहाके फळरज दृयडांगरि : फळरज :
( ६ ) सेउगा देवंड गिंगिनि डारालि फर्ळ : हिंयावळि : निर्गुडि : नागवेलि
( ७ ) पर्म समभागें चूर्ण करुनि सेंदे मरिज : यथामात्रा नाकिं मस्यु
( ८ ) दिजे : भमू फिटे : सन्निप लोटे ॥ ७ ॥ हरिलेपस्रातु ॥ मधुकासा
( ९ ) रसिंधुर्छ पघोपर्ण कणां समं सद्मां प्रमोघनं मस्य : सन्निपातं
(१०) कफात्मकं ॥ ९ ॥ टोळबि-मञ्मा सैंधव : वेपंड : मीरिवें पींपळि : सम
१०](११) मार्गें नस्यु विजे सद्मां करि कफोतर सन्निपातु हरे ॥ ७ ॥ श्रीकृ

## पृष्ठ १२३ पोट

( १ ) टीका ॥ तेल्या पळें४ अंबर पळें४ तुप पळे दो २ पदम टांक १ २ मेरीटांक म १
( २ ) मधु टांक ६ नागाद टांक १ शिलारस टांक ६ लवग टांक ६ मव टांक नि
( ३ ) ३ कोष्ट टांक ४ लोबाण टांक पो ५ ॥ मेण टांक दीड १ ॥ एकत्रं पीठ करुनु
( ४ ) भीजउनु सात दीन ७ मग यंत्रीं भरीजे पाताळयंत्री तेल काढीजे ॥ या नावं
( ५ ) कामिनीमनोहरगंधराजु ॥७॥ पञुदेवपळं चाम्पं पळं द्वादश चंदन ॥ से
( ६ ) ल्यं दशपळं पोग्यं पाला दशपळं सिता ॥ १ ॥ मुस्तालवंगलोबाणगु
( ७ ) ग्गुळं तगरं मधु ॥ हिमचदुनलिका पृथगष्पळं भवेत् ॥ २ ॥ अंपरं चे
( ८ ) रीताशारुजातीकोष्टं मय पृथक् ॥ एकैकपळश्रमानं राजद्रुमापळ ग
२०]( ९ ) वि ॥ ३ ॥ पतसंधानमांध च पक्षभूतरयंत्रके ॥ ४ ॥ टीका ॥ तेल्य टांक
(१०) चोवि २४ अंबर टांक चो २४ लोबाण टांक चो २४ पदम पळ ये १ तगर
(११) पळ १ देवदारु पळ ये १ कोष्ट पळ ये १ नव पळ ये १ राळ पळ १

## पृष्ठ १२३ पाठ

( १ ) + + + + + पक्ष येक भीजों देईजे : मग यंत्रीं पालीजे : गंधराजु
( २ ) ॥ ७ ॥ तेल षाटपळ शशीश्चमुपळं श्रीचंदन द्विपळं लोंपार्ण गनकं ।
( ३ ) टपूरीतमळं पेरीत्यर्ग पूर्त ॥ पृथगळसळं सवेदनिशर्ज ण्काम
( ४ ) मांडे मुने ॥ भांडे यंत्र विपाय भमि मीवसे सर्त्य भिरेत् केतकी ॥ १ ॥ मषा
( ५ ) नां जनवल्लभं रमैणिकं कंदुपकोयाहद ॥ १ ॥ टीका ॥ तन्त्र पट ८ सींगम

( ६ ) काष्ट पळें ८ चदन पळें २ पीत म्हणतां अगरु पळे २ अबर पळें मधू
( ७ ) पळें २ लोबाण पळ १ घृत पळ १ तिळज म्हणता तेल पळ पांच ५ येकत्र क
( ८ ) ढवीजे : दीर्सा साता ७ यत्री भरीजे : पाताळयत्रे तेल घेईजे : केतकीप
( ९ ) त्राचा वासु देईजे : या गधराजा नाव कंदर्पकौतूहळु ॥ छ ॥ पळं चत्वारि तै
(१०) लानां द्विपळ स्नेहमुच्यते ॥ मधुलोबाणबेरी च क्षौद्रजांबरपंकजं ॥
(११) ॥ १ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥छ॥ गोसावीयाचेया सीस०८१७८९१०११गंधराजुः

वि. का राजवाडे

# १६ हातगा ऊर्फ भोंडलें*

१ महाराष्ट्रांत हातग्याचीं ऊर्फ भोडल्याचीं गाणी घरोघर मुलीच्या सर्वतोमुखीं आहेत हस्तनक्षत्राच्या प्रारंभापासून शेवटल्या दिवसापर्यंत दर रोज एकेक गाणे [१० वाढवीत सोळाव्या दिवशी सोळा गाणी म्हणतात शेजारच्या पाजारच्या दहापांच मुली तिसऱ्या प्रहरी एकत्र होतात, वेचून आणून चार खडे मांडतात व हातगा म्हणून त्यांची फुलानी व पानानी पूजा करतात आणि नतर फेर धरून ही गाणी म्हणतात. हातगा म्हणजे हस्तग्रह भोडले किंवा भोडला म्हणजे काय ते समजत नाही ह्या शब्दाचा अर्थ च माझ्या ध्यानात येत नाही व्युत्पत्ति हि माहीत नाही हातग्याला च दुसरं नाव भोडले असावे. परतु निश्चयाने काही च सांगता येत नाही

२ गाण्यात प्रारभ एका विषयाचा असतो व शेवट त्या विषयाला सोडून निराळा च काही असतो उदाहरणार्थ पहिले गाणे. ह्या गाण्यांत प्रथम गणपतीचे नाव घेतलें आहे. ते रास्त च आहे अयलमा म्हणजे अथम व पयलमा म्हणजे प्रथम.

अथ + ल + म = अहलम = अअलम = अयलम = अयलमा (सप्तमी) [२०
प्रथ + ल + म = पहलम = पअलम = पयलम = पयलमा (सप्तमी)

नतर, गणेशाला मुलगी प्रार्थिते की, माझा खेळ मांडण्यास अनुज्ञा दे. खेळ गांवच्या वेशीच्या दारी माडिला तो वेशीच्या बुरजावर पारवा घुमत होता त्याकडे लक्ष्य गेले, तो फकिरासारखा एकटा च होता त्याचे डोळे गुंजेप्रमाणें लाल होते. त्याच्या दुष्ट डोळ्याच्या टीका गांवच्या भुलोजी नांवाच्या नाइकानें ऊर्फ पाटिलानें

* या गाण्यांत पाठभेद फार आहेत व ही गाणी म्हणण्याच्या वेळा प्रांतोप्रांतीं निरनिराळ्या आहेत. शिवाय गाण्यांची सख्या हि क्वचित् जास्त आहे

११

सोन्याच्या शिंपीनें दूध पाजिलें आणि मग त्याला झोपी लावलें नंतर मुली माळा-वर खडे वेचावयाला गेल्या, त्या खड्यात एक मोठा खडा असेल त्याला गवरा म्हणतात. गवरीचा नवरा गवरा. गवऱ्याला मुली विचारतात, बा, कधी येशील. चैत्रात येईन, म्हणून तो सागतो तेव्हा मुली चैत्राला म्हणतात, चैत्रा चैत्रा, लवकर ये, म्हणजे हातग्याला हात घालू व देव्हान्यात देव बसवू. नंतर देव बसविल्यानंतर देव्हान्याच्या चवकटीपुढें मुली नाचतात व म्हणतात:—देव्हान्याच्या चवकटी, उठता बसतां लाथबुक्की.

ह्या गाण्यात लिंबे, हणमत, निळी घोडी, कमळें, अचरा व गवरा ह्याचा उल्लेख आला आहे सर्व च कल्पना अतींद्रिय आहेत. मारुती अप्सरा व गवरे, एतत्संबंधी भूतसृष्टींतील ज्या काल्पनिक गोष्टी समाजात त्या काली प्रचलित होत्या त्यांचें [१० वर्णन ह्या गाण्यात आलें आहे. एकदरीत गाण्याचा अर्थ सोपा नाही, गूढ आहे

४ तिसरे गाणें : गावात एक खाऱ्या पाण्याचा आड आहे. तो च कल्पनासृष्टीला व शब्दचित्राला पाया म्हणून घेऊन, त्याच्यावर कल्पना चालविल्या आहेत खाऱ्या आडाच्या खाऱ्या पाण्यात वडील बाया मुलाच्या आग्या टोप्या धूत आहेत. इतक्यात आडात साप निघाला व आग्या टोप्या हरवल्या आळ सापावर आला. साप म्हणतो मी एकुलता एकटा आहे, दारच्या पिकल्या आब्याला विचारा तो खरें च. आब्याची कोय दारी पडली होती लुच्चा आबा आग्या टोप्या घेऊन पळाला, पण आपली कोय न्यायला विसरला, त्यामुळें उमगला. आब्याची झडती घेणे जरूर झाले आब्यावर मोर नाचूं लागले. बायानी दिवट्या घेऊन आग्या टोप्याचा शोध चालविला इकडे मुली आपला खेळ खेळू लागल्या व खेळताना म्हणतातः—आम्ही [२० सुंदर मुली डोळ्यात सुदर काजळ घालू व सासरमाहेर करू, आमचें सासरमाहेर इतर घराप्रमाणें साधे नाही, गबर आहे, तेथें मातीच्या चुली नाहीत, ताब्याच्या चुली आहेत मुली मलकापूरच्या होत्या मलकापूर ह्या शब्दाचा खरा उच्चार मलकान्पूर् मलिक याचें फारशी अनेकवचन मलकान् मलकाचें जे शहर तें मलकानपूर त्याचा मुलींनी अपभ्रंश मकलामपूर असा केला मलकापूर हें गाव कोल्हापूर इलाख्यात आहे व ते तेथील प्रतिनिधीची सध्या राजधानी आहे गाणें फार जुनाट आहे. इतकें च की ज्या प्रदेशात ज्या कालांत हें गाणें म्हटलें जातें त्या देशातील व कालातील शहराचें नाव त्यात सहज च येते मकलामपूर हें नाव मुसुलमानी अमलानतर गाण्यात शिरलेलें आहे, हें उघड आहे.

५ गाणे चौथें: हें गाणें फार सुंदर आहे, अप्रतिम आहे धाकुटी चंद्रावळ घराच्या [३० आंगणांत खेळत होती तिचा पदर धाकुट्या कृष्णानें धरिला त्याचा चद्रावळीला तिटकारा आला व तिनें वैताग घेतला. ती सुतार झाली. तिने एक बाभळ तोडिली. चौरग घडविला

व त्या चौरगावरून पारिजातकाची सुवासिक व दिसाऊ वृक्षाची फुलें तोडिलीं व त्यांचा हार गुंफून हातम्याला वाहिला पांच चार मापांतलीं मीं पुष्कळ सुंदर गाणीं वाचिलीं आहेत परंतु ह्या तोडीचें गाणें मला कोठें आढळलें नाहीं वेताग हा शब्द वित्याग शब्दाचा अपभ्रंश आहे विशेषेण त्याग वित्यागः

६ गाणें पांचवें : हें गाणें देवगिरीच्या यादवांच्या वेळचें किंवा त्यांच्या हि पूर्वीचें आहे कारण, पंढरपूर एवढेसें गाव होतें, असें यांत म्हटलें आहे ह्यांत पंढरपूरच्या माळ्णीचें आपल्या नवऱ्यावरील प्रेम व कंगण्या देशाच्या राजाचा तिर कारा कथीनें दाखविला आहे

७ गाणें साहावें : ह्यांत मामावरील प्रेम, मामीचा कजुपपणा व दिराची थट्टा १०]केलेली आहे

८ गाणें सातवें : ह्यांत सोनचाफ्याच्या फुलांचे हार हातम्याकरितां गुंफिले आहेत

९ गाणें आठवें : ह्यांत आईचें आपल्या लहान मुलावरील वात्सल्य वर्णिलें आहे

१० गाणें नववें : ह्यांत मामाच्या घराचें वर्णन आहे व धाकट्या दिरावरील प्रेम दाखविलें आहे कोल्हापुराजवळील रत्नागिरीचा उल्लेख आहे तेलंगपूर कोठलें कोण जाणे! पण ते त्या काळीं लुगड्यामद्दल प्रसिद्ध पेठ असावें

११ गाणें दहावें : यांत कोथिंमिरीला उद्देशून कवन केलें आहे नामी आहे

१२ गाणें अकरावें यांत भुज्या भाऊ व त्याची बहिण यांचें वणम आहे

१३ गाणें बारावें : यांत नव्या नवरीचें सासरीं जाणें वर्णिलें आहे

२०]१४ गाणें तेरावें यांत वडील जावेची थट्टा केली आहे

१५ गाणें चौदावें यांत नव्या नवरीचें सासरीं जाणें वर्णिलें आहे फडेगांवचा उल्लेख आहे

१६ गाणें पंधरावें :

१७ गाणें सोळावें : कोळशासारख्या काळ्या पुलोआचें वणग आहे

१८ गाणें सतरावें : हें एक उखाणें-वजा गाणें आहे

१९ गाणें अठरावें : यांत सासरच्या माणसांचा विनोद आहे

सांगली–देशस्थ ब्राह्मण मुलगी ( द ) हातग्याचीं गाणी हस्तनक्षत्री सुरू. दर दिवशी एक एक गाणे वाढवीत जावयाचे सोळाव्या दिवशी सोळा गाणीं.

## ( १ ) हातगा

१ अयलमा पयलमा गणेश देवा । २ माझा खेळ मांडू दे करू तुझी सेवा ॥
३ माझा खेळ मांडिला वेशीच्या दारी । ४ पारवळ घुमतें बुरजा वरी ॥
५ पारवळ फकिराचे गुंजाणे डोळे । ६ गुंजाणे डोळ्याच्या सारविल्या टीका ॥
७ आमच्या गावच्या भुलोजी नायका । ८ एवी निघा तेवी निघा ॥
९ कांडा तीळ बाई तांदूळ घ्या । १० आमच्या आया तुमच्या आया ॥
११ खातील काय दूध–उंडे । १२ उंड्याशी लागली टाळी ॥
१३ औषध दे रे बा माळी । १४ माळी गेला शेता भाता ॥ [१०
१५ पाऊस लागला येता जाता । १६ पड पड पाउसा थेंबा थेंबी ॥
१७ थेंबा थेंबी आळ्या लोंबी । १८ आळ्या लोंबती आखण ( आंकण ) ॥
१९ ( क ) आखणा तुझी सात कणसें । २० हातग्या तुसी सोळा वर्षे ॥

## ( १ ) हातगा

| | | |
|---|---|---|
| १ भोंडले भावे भावे ।<br>२ तुम्ही निघा पेवे पेवे ।<br>( १०) ३ आमच्या आया तुमच्या आया | } | हा प्रारंभ कोठें कोठें करतात |
| २१ आतूला मातूला ।<br>२२ चरणी घातूला ।<br>२३ चरणीचे सोंडे ।<br>२४ हातपाय खणखणीत गोंडे ।<br>२५ एक एक गोंडा विसाचा ।<br>२६ नेसा ग नेसा भावल्यानों ।<br>२७ वरीस वरीस पावल्यानों । | } | हे चरण आणीक कोठें कोठें म्हणतात [२० |

## ( २ ) हातगा ( द )

१ एक लिंबू झेलू बाई दोन लिंब झेलू । २ तीन लिंब झेलू बाई चार लिंब झेलू ॥
३ तीन लिंब झेलू बाई चार लिंब झेलू । ४ चार लिंब झेलू बाई पाच लिंब झेलू ॥

५ पाच लिंब पाणवठा । ६ माळ पाळी हणमंता ॥
७ हणमंताची मोळी घोडी । ८ येता जाता कमळें तोडी ॥
९ कमळा पाठी मार्गे होती राणी । १० अग अग राणे कुठ कुठ पाणी॥
११ पाणी मध्ये यमना जमना । १२ यमना–जमनाची यादिक वाळू ॥
१३ तिथ खेळ तिळार–वाळू । १४ तिळार-वाळूला भूक लागली ॥
१५ सोन्याच्या शिंपीनें दूध पाजिलें । १६ मीज मीज पाळा वेल्हाळा ॥
१७ आम्ही जातो वरच्या माळा । १८ वरच्या माळा जाउंगा ॥
१९ पाच खडे आणूंगा । २० एक खडा मोठा ॥
२१ गवरे आले पोरग । २२ गवऱ्या तुर्हे ठाणग ॥
१०] २३ आता कधीं येणें ग । २४ आता येणें चैत्रमासीं ॥
२५ चैत्रा चैत्रा लवकर ये । २६ हस्त पालीन हस्तारा ॥
२७ देव मसर्वान देव्हारा । २८ देव्हाऱ्याच्या चवकटीं ॥
२९ उठतां बसतां लाखमुक्ती ॥

---

## ( ३ ) हातगा

१ आड माड आडवणी । २ आडाचें पाणी सारवणी ॥
३ आडांत होत्या बायका । ४ आंगी टोपी ल्याइका ॥
५ आंगी टोपी हरपली । ६ हरपा पार्या दडपळी ॥
७ सरप म्हणे मी एकूला । ८ दारीं अंबा पिकूला ॥
९ दारीं आंब्याची कोय ग । १० आंबा नाचती मोर ग ॥
२०] ११ रंभा पाडी दिवग्या । १२ आम्ही लेकी गोमग्या ॥
१३ गोमग काजळ लेउगा । १४ सासरीं माहेरीं जाउगा ॥
१५ सासरीं माहेरी तांब्याच्या पुरी ।१६ मेडप पातला मकरामपुरी॥

## ( ४ ) हातगा ( च )

१ भाकूनी चंद्रावळ बाइ रोवली आंगणीं । २ रोवली रोवतां बाइ रुण्याची देमिरी ॥
३ रुण्याची देमिरी बाइ पाल्या घरिरीं । ४ साइ साइ पालपा मीं तिकडे जाइन ॥
५ तिकडे जाइन मी बेताक येइन । ६ बेताक येइन मी यामर जे नाईन ॥

७ बावळ जे तोडीन मी सुतार जे होईन । ८ सुतार जे होईन-मी चौरंग जे घडवीन॥
९ चौरग जे घडवीन मी कळ्या जे तोडीन। १० कळ्या ज्या तोडीन मी हार जे गुंफीन॥
११ हार जे गुफीन मी हातग्याला वाहीन॥

## (५) हातगा

१ एवडस होत पंढरपुर । २ एवडस होत पढरपूर ॥
३ विठोबारायाच-नगर । ४ रखमाबाईच सासर ॥
५ विठोबा राया द्वारोद्वारी । ६ शंभो मोट मोट धारी ॥
७ अगग भुलाई माळणी । ८ तुला राजा बोलावितो॥
९ तुला कगण्या घडवितो । १० जळो मेल्याच्या कगण्या ॥
११ विकीन सोनीयाची भाजी १२ घेईन मोतीयाचा तेजी ॥ [१०
१३ माझा माळी जो बरवा । १४ दडी रुमाल हिरवा॥
१५ दंडी रुमाल काय काय परी । १६ हिरा झळकतो तून्या वरी ॥

## (६) हातगा

१ बाईच्या परसांत भेंडीच रोप । २ भेडीच रोप सारवल ॥
३ मामाचं घर थोरवल । ४ मामाच्या घरी येऊं-जाऊ ॥
५ तूपरोटी खाऊ-जाऊ । ६ घाल ग मामी तुपाची धार ॥
७ तुपाची धार गेली वाऱ्यान ।८ आई आली चूड्यान॥
९ बाप आले घोड्यान । १० बहिणी आल्या पालखीन ॥
११ भावजी आले कुत्रीन । १२ काहो भावजी रूसला ॥
१३ काळा विंचू डसला । १४ काळा विंचू पापी ॥
१५ रांजणाच्या काठी । १६ रांजण गेला गडगडत॥ [२०
१७ भावजी बसले चरफडत ॥

## (७) हातगा

१ सखूबाई तुमच्या आंगणी । २ सुदर चाफा लावणी ॥
३ ऐसा चाफा फुलला । ४ चला बाई कळ्या तोडाला ॥

५ आम्ही पाई फळ्या तोडील्या । ६ आम्ही पाइ हार गुंफीले ॥
७ हारा हारा प्रेमाळी । ८ तिन्हईनं आले वनमाळी ॥
९ सोडा सोडा कापोळी । १० रात्र झाली गोकुळी ॥

## (८) छातगा

१ एवढं एवढसं पासरूं । २ लाल लाल की त्याची चोच ॥
३ गुंजाचाणी ग त्याचे डोळे । ४ सात पाताळी बाळ खेळे ॥
५ कीं पासरूं मार्झ । ६ कोण्या चाजारार्शी गेल ॥
७ कोण्या मारीनं खुणाविलं । ८ कीं पासरूं माझ ॥
९ दुसा दुधानीं मरल्या चाऱ्या । १० परि सासर रायपुरी ॥
] ११ माझा जेवणारा माना परी । १२ कीं पासरूं मार्झ ॥
१३ कोण्या चाजारार्शी गेलं । १४ कोण्या मारीनं खुणाविल ॥
१५ दुसा दुधांनी भरल्या । १६ वाऱ्या परि सासर रायपिठी ॥
१७ उठ गोविंद जेवायाला । १८ कीं पासरूं मार्झ ॥
१९ इस्तीदंताची आणा फणी । २० जांवळ विंचरूनी घाला वेणा ॥
२१ कीं पासरूं मार्झ । २२ काण्या मारान खुणाविलें ॥
२३ कीं पासरूं मार्झ । २४ काण्या माऱ्यानं केला मळा ॥
२५ सर्व पासरूं तूझा मळा ॥

## (९) छातगा

१ पानपुडा कीं शंकरपुडा कीं शंकरपुडा ।
२०] २ माझा मामा ग लेकूरवाळा कीं लेकूरवाळा ॥
३ मामाच्या परीं दुमतंय काहीं कीं दुमतंय काहीं ।
४ सोळा म्हशी कीं दान च गाइ दान च गाइ ॥
५ मामा पाहुणा आला बाइ ग आला बाइ ।
६ साकरउंड कीं दोन च मांड कीं दोन च मांड ॥
७ मामासगट मामी मांड कीं मामी मांड ।
८ मामा गेला ग सेलंगपुरा कीं सलगपुरा ॥

९ तेलगपुरासनी आणली साडी ग आणली साडी।
१० नेसून गेले मी बरव्या पाण्या की बरव्या पाण्या॥
११ तेथे होता ग धाकटा दीर कीं धाकटा दीर ।
१२ उतरून घेतला मी कडेवरी की कडेवरी ॥
१३ चार चाबूक चमकावीले की चमकावीले ।
१४ माझ आजोळ रत्नागिरी ग रत्नागिरी॥
१५ रत्नागिरींच्या टांक्यावरी ग टाक्यावरी ।
१६ शेला वाळत चांफ्यावरीं ग चाफ्यावरी ॥

## ( १० ) हातगा

१ कोथिंबिरी बाई ग । २ आता कधी येशील ग ॥ [१०
३ आता येईन श्रावणमासीं । ४ श्रावणा श्रावणा लवकर ये॥
५ तुला घालीन हौसरी । ६ हौसरीचा चोळा मोळा ॥
७ देव बैसले देव्हारा । ८ देव्हाऱ्याच्या चौकट्या ॥
९ उठतां बसतां लाथाबुक्या ॥

## ( ११ ) हातगा

१ आला चेंडू गे चेडु राय चेडू दुधा । २ आलगींची गया बाई पलगीची गया॥
३ आपण चाले हत्ती घोडे रांम चाले पायी ।
४ रामा ग वेचिति कळ्या, सीताग गुंफिति जाळ्या ॥
५ आल्याग लगिन वेळा, दस्तुरि घातिले बहुल ।
६ आकाशी घातिला माडव, दर्शन दर्शी बसल्या पक्ति ॥ [२०
७ भुलोजी राया मुजा बाळा । ८ मुंजा बाळाची मुजक दोरी ॥
९ ती च दोरी सांवध करीं । १० सावता सावता लागला दोर ॥
११ तो च दोर सावध करी । १२ आणा दोर बांधा चोर ॥
१३ घाधला चोर झाडाशी । १४ झाड झबका फूल टपका ॥
१५ ते म्यां फूल तोडिले । १६ वहिणी माथा सोविले ॥
१२

१७ वहिणी तुझी वेणी ग । १८ केतकीची फणी ग ॥
१९ वहिणी तुझा भांग ग । २० मोतीयाचा भांग ग ॥

## ( १२ ) हादगा

१ नणंदा भावजया खेळत होत्या । २ खेळता खेळता तंटा झाला ॥
३ भावजई घरी जाय आला । ४ नणंद गेली समजावयाला ॥
५ उठा उठा वहिनी चला घराला । ६ सगळा खेळ देते तुम्हाला ॥
७ मी नाही यायची तुमच्या घराला।८ सासुरवाशी सुन रुसून बैसली कैसी ॥
९ यादवराया राणी रुसून बैसली कैसी। १० भाऊजी गेले समजावयाला ॥
११ पाटी पेणशील देतो तुम्हला । १२ सासुरवाशी सुन रुसून बैसली कैशी ॥
१०]१३ यादवराया राणी रुसून बैसली कैशी । १४ जाऊ गेली समजावयाला ॥
१५ उठा उठा बाई चला घराला । १६ मी नाही यायची तुमच्या घराला ॥
१७ सासुरवाशी सुन रुसून बैसली कैशी।१८ यादवराया राणी रुसून बैसली कैशी ॥
१९ सासू गेली समजावयाला । २० उठ उठ सूनी चल घराला ॥
२१ ताकाचा डेरा देते तुम्हला । २२ मी नाही यायची तुमच्या घराला ॥
२३ सासुरवाशी सून रुसून बैसली कैशी।२४ यादवराया राणी रुसून बैसली कैशी
२५ सासरा गेला समजावयाला । २६ उठ उठ सुनी चल घराला ॥
२७ दौत लेखण देतो तुम्हला । २८ मी नाही यायची तुमच्या घराला ॥
२९ सासुरवाशी सून रुसून बैसली कैशी ।३० यादवराया राणी रुसून बैसली कशी ॥
३१ पति गेले समजावयाला । ३२ उठ उठ राणी चल घराला ॥
२०]३३ शाल पाबुक देतो तुम्हला । ३४ उठली ग उठली गजगामिनी ॥
३५ खोपा घेतला सावरोनी । ३६ पदर घेतला आवरूनी ॥
३७ उठ उठ राणी चल घराला । ३८ मी येते तुमच्या घराला ॥
३९ सासुरवाशी राणी घरासी आली कैशी।४० यादवराया राणी घरासी आली कैशी ॥

## ( १३ ) हादगा

१ अक्कड माई कवठ ग । २ कवठासन आणिला कागद ग ॥
३ तो पडला गंगेत ग । ४ अष्टकुळ मिष्टकुळ भाऊ ग ॥

५ पडोल माती गाऊ ग । ६ तुझा घरा कारीती ॥
७ घवर घवक घालिती । ८ घालितानी देनोली ॥
९ भाऊजींनी ठेसीली ॥

## ( १४ ) हातगा

१ आरडी बाई परडी ग । २ परडी येवढे फूल ग ॥
३ दारी मूळ कोण ग । ४ दारी मूळ सासरा ॥
५ सासऱ्याने आणिल्या पाटल्या । ६ येत नाही बरोबर ॥
७ बसत नाही घोड्यावर । ९ आरडी बाई परडी ग, परडी येवढे फूल ग ॥
१० दारी मूळ सासू । ११ सासून आणिल्या सांखळ्या ॥
१३ येत नाही बरोबर, बसत नाही घोड्यावर । [१०
१५ आरडी बाई परडी ग, परडी येवढे फूल ग ॥
१६ दारी मूळ दीर । १७ दीरान काय आणील ॥
१८ दिरान आणिले पाटे । २० येत नाही बरोबर, बसत नाही घोड्यावर ॥
२२ आरडी बाई परडी ग, परडी येवढे फूल ग । २३ दारी मूळ नणंद ग ॥
२४ नणदेन काय आणिल ग बाई । २५ नणदेन आणिले गोठ ग ॥
२७ येत नाही बरोबर, बसत नाही घोड्यावर ।
२९ आरडी बाई परडी ग, परडी येवढे फूल ग ॥
३१ दारी मूळ कोण ग, दारी मूळ पति । ३२ पतिन काय आणले ग बाई ॥
३३ पतिन आणिली नथ ।३५ येते तुमच्या बरोबर, बसते तुमच्या घोड्यावर॥
३६ आरडी बाई परडी ग ॥ [२०

## ( १५ ) हातगा

१ एवढासा तांदुळजा । २ नखांनी खुडीला ।
३ बाग जिऊ बाधिला । ४ वेशी बाहेर टाकून दिला।
५ गाय आली हुगून गेली । ६ म्हैस आली खाऊन गेली ।
७ म्हशीला जाहाला रेडा । ८ गाईला झाला पाडा ।
९ तो च रेडा पाडा माझ्या बापाजीचा वाडा॥

१० बापाजीनं दीला जांमळा घोडा । ११ जामळ्या घोड्याची मीटकी चाल॥
१२ जेथें पाऊल पडे तेथे केडगाव शहर । १३ केडगांवचे ठंद ठंद ठसो ॥
१४ ठसो ठसो अंमर पुरो ।

## ( १६ ) हातगा

१ काळा कोळसा छिकू छिकू राणा । २ पाळखीत घसला पुलोजी राणा ॥
३ पुलोजिची घोडी फितक्याची । ४ नाईग हाग्मा मोत्याची ॥
५ मोती सरडून शप्फूल । ६ शप्फूलाच्या टिका ग ॥
७ टिका टिका म्हणूनी नगराशा जाता । ८ नगरासी जाता मोजम करिता॥
९ मोजम करितां लागली काडी । १० काडी मोडून बांधली माडी ॥
१०] ११ माडी मोडून बांधलं तळे । १२ त्या बाइ तळ्यांत परिट कोण धुतो ॥
१३ विठोबाच्या टोपीला निळा रंग देतो । १४ रखमाइच्या चोळीला शाहारंग देतो॥

## ( १७ ) हातगा

१ मोपळीचं फूल घाई फुल रंजना । २ मळ्याच्या कार्नी मळ रंजना ॥
३ माळ्यानं सांडली भीकबाळी । ४ हुडकुन दे या भूपणा ॥
५ हुडकली पण गवसे ना ॥

## ( १८ ) हातगा

१ काळी चंद्रकळा नेसू कशी ! । २ गळ्यांत हार, घालूं कशी ! ॥
३ पायांत पैंजण, चालूं कशी ! । ४ बाहेर मामंजी, बोलूं कशी ! ॥
५ दमडीचं तेल आणूं कशी ! । ६ दमडीचं तेल आणीलं ॥
२०] ७ सासूबाईचं न्हाण जाहालं । ८ वन्सबाईची वेणी जाहाली ॥
९ माऊजीची शेंडी जाहाली । १० मामंजीची दाडी जाहाली ॥
११ उरलं तेल झाकून ठेविलं । १२ त्यांतरीचा पाय लागला ॥
१३ देशी बाहेर ओघळ गेला । १४ त्यांत रेडा वाहून गेला ॥

१५ सासूबाई सासूबाई अन्याय जाहाला । १६ एवढा अन्याय पोटांत घाला ।।
१७ दूध–भात जेवायला घाला ।।

वि० का० राजवाडे

# १७ मध्व

मध्वाचार्य हा समास मधु + आचार्य किंवा मध्व + आचार्य असा दोन प्रकारांनी सोडवितां येतो. म्हणजे द्वैतसंस्थापकाचें नांव मधु व मध्व असें दोन प्रकारचें असावें, असा निष्पाद होतो. मधु या शब्दाचा अर्थ गोड ( विशेषण ) व मध ( नाम ) असा आहे. ( मध्व ) मध्वक या शब्दाचा अर्थ भृंगा असा आहे मधु हें संस्कृतात देवदैत्य व मानव याचे नाव आढळतें. मध्व हें नांव संस्कृतात मनुष्याचें मध्वाचार्य ह्या समासाखेरीज इतरत्र कोठे आलेले मला माहीत नाही तेव्हा, प्रश्न[१० असा उद्भवतो की, ह्या द्वैताचार्यांचें मूळ नांव मध्व का मधु ? दोन्ही नावें एका च व्यक्तीची असूं शकणार नाहीत. एक मधु तरी मूळ नाव असेल किंवा मध्व तरी असेल मधु हें जर मूळ नाव असते, तर त्यापासून तद्धित शब्द माधव असा होता पण माधवमत असें कोणी म्हणत नाही माधवमत असा बोलण्याचा व लिहिण्याचा प्रचार आहे सबब, द्वैताचार्यांचे मूळ नांव मध्व होते, हा पक्ष खरा मानावा लागतो मध्वक म्हणजे षट्पद, भृंगा, मध गोळा करणारा परतु मध्वक म्हणजे कांही मध्व नव्हे मधु + अक = मध्वक, असा जर विग्रह असेल, तर मध्वक हा मूळ शब्द होईल, मध्व होणार नाही. मध्व हा शब्द अपभ्रंश म्हणावा लागेल. मध्व असा स्वतंत्र शब्द संस्कृतांत मध्वाचार्यांच्या पूर्वी नाही तेव्हा एक च तोड रहाते. मध्व हा मध्वक शब्दाचा अपभ्रंश आहे. तात्पर्य, मध्व हा एका प्रकारचा प्राकृत शब्द[२० आहे, असें म्हणावें लागतें मध्वाचार्य फार विख्यात पुरुष झाला, त्यामुळें मध्व हा प्राकृत शब्द स्वतंत्र संस्कृत विशेषनाम म्हणून योजिला जाऊ लागला इतकें च.

वि का. राजवाडे

# १८ अनुभवामृतांतील कांही अप्रसिद्ध ओवी

सर्व साधुसंतांचे ग्रंथ, होतील तितके मूळ प्रतीवरून छापण्याचा, प्रयत्न होणें अत्यन्त अवश्यक आहे हें मत आतां सर्वत्र ग्राह्य झाले आहे. तेव्हां

त्याच्या युक्तायुक्ततेबद्दल विवेचन करण्याची आतां जरूरी नाहीं मूळ प्रतीवरून ग्रंथ छापविणें हें इतर साधुसंतांच्या बाबतींत जितकें अवश्यक आहे, त्याहून—अनेक दृष्टीनें—श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे ग्रंथांचे बाबतींत तें अधिक इष्ट व आवश्यक आहे परंतु दुर्दैवानें त्या दिशेनें अद्याप मोठ्या प्रमाणावर प्रयत्न होऊं लागला नाहीं परमेश्वरकृपेनें तशा प्रयत्नांची स्फूर्ति आधुनिक विद्वानांच्या चित्तांत लवकर च उद्भवो, निदान होणाऱ्या प्रयत्नांत ते अडथळा आणण्याची भावना न धरोत

माझ्या संग्रहीं एक बरीच जुनी 'अनुभवामृता'ची पोथी आहे. ती बहुधा मोग लाईंत मला उपलब्ध झाली असावी ( निश्चिततेनें सांगतां येणें शक्य नाहीं ) १०]तिच्यांतील पाठ जुने आहेत, व हल्लीं प्रसिद्ध असलेल्या सर्व पोथ्यांतील पाठांहून ते अत्यन्त भिन्न आहेत याहून हि विशेष ध्यानांत ठेवण्यासारखें हें आहे कीं, आज प्रसिद्ध असलेल्या सर्व पुस्तकांत अगदीं शेवटली म्हणून जी ओवी प्रसिद्ध आहे त्या ओवीनंतर इच्यांत आणखी २५ ओवी जास्त आहेत त्या श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या ओवींसारख्या च आहेत हें त्या प्रत्यक्ष वाचल्यावरून तेव्हां च ध्यानीं येईल

आज ज्या छापील प्रती आहेत, त्यांच्यांत ओवींच्या संख्येंत एकवाक्यता मुळीं च नाहीं ह प विष्णुबुवा जोग यांच्या प्रतींत एकंदर १० प्रकरणें मिळून ८०६ ओवी आहेत रा आण्णासाहेब कुंटे यांच्या प्रतींत ९ वे प्रकरणीं एक ओवी वरच्याहून कमी आहे ती ही:—

पाहे या अवघेया । हला हलेंचि यथा ।
२०] परि दुसरा नाहीं तया । विस्तारु जेवीं ॥ ४२ ॥

प्रकरण ६ यांत हि एक आहे आहे ती —

सूय सूयासी विकळे । फळ आपणया फळे ।
कीं परिमळु परिमळें । घेपतसे ॥ ७८ ॥

या वरील दोन्ही ओवींवर शिवकल्याणांची टीका नाहीं

रा धले यांनीं शक १८०४ त व रा सावंत यांनीं शक १८१९ त ज्या प्रती छापविल्या आहेत त्यांत ९ वे प्रकरणांत एक ओवी ह प विष्णुबावांच्या ग्रंथां तील ओवीहून अधिक आहे ती —

पूतांकुर जाला कोकिळ । अगथने मलयानिळ ।
रस जाला रसाळ । रसनार्थत॥
३०] ( यांत हि परस्परांत पाठभेद आहेत )

इतका जेथें प्रत्यक्ष ओवींच्या सख्येंत घोटाळा आहे तेथें या निरनिराळ्या पुस्तकांतून असलेल्या भिन्न भिन्न पाठांपैकी मूळपाठ कोणते व अपपाठ कोणते हे बाह्य साधनावाचून निर्णित करणें अत्यन्त दुष्कर, नव्हे अशक्य होय. आणि अशा स्थितीत अशा ग्रंथाच्या,श्रवण, मनन व पठणावरून कोणती हि अनुमानें काढणें एक प्रकारें धाष्टर्याचें होईल असो

वर दर्शविलेल्या माझ्या जवळील पोथींत ज्या ओवी आहेत त्या खाली देतो.

जे ग्रंथाचा आदि सेवटीं । आणि मध्यभागाचा पोटीं ।
ना ना अधिकार स्फुटी । अनुभवा चि जे ॥
ते ईतुके ग्रंथ विस्तारी । निरूपण केले परोपरी ।
पदापद कुसरी । अक्षरांचेनि ॥ [१०
तया अक्षरांचा गाभा । अवघे स्वरुप चि शोभा ।
जे आदि अतु दिगू नभा । माजी परुतें जे ॥
तें क्षराक्षर मात्रुकाक्षरीं । व्हृस्व दिर्घ ना प्लुत उच्चारि ।
काना मात्र बिंदुले या परि । विस्तारलें ॥
येसें काना मात्र बिंदुलेनीं । अक्षराचिये उभवणीं ।
वोविमागे वोविखुनि । अखडते ते ॥
तेया तंतु चि महिमा । सुत्रें मणिगणा येसी सिमा ।
जेवि ततु पटु अतर्वहिमा । पटरुप ॥
तेवि सुवस्त्राचि परी । अक्षरांचिये कुसरी ।
शब्दरत्नाचे नि परोपरी । श्र्घारीली ॥ [२०
जेवि अमृताचिये खोटी । ना तरी घृत थीजे घटीं ।
ते कणीकाकार दिसे दीठी । परी घृत चि सगळे ॥
तेवि अनुभवामृत सागरीं । अक्षरें उमळलि परोपरी ।
ते दिसति तरंगाकारी । सगळेन ब्रह्में ॥
तैसें अमृतानुभव घृत । अक्षरें कणीकाकारें थीजत ।
शब्दरत्नाचे गरे होत । वोवियां सहित ॥
तेंचि प्रमेय यके जळ । सुख स्वानुभवासि होति कल्लोळ ।
आनदा आनदीं सुकाळ । सकळपणाचा ॥

तें विवेकाचेन झालें । अनुभवाचि जीम मेथें ।
सत्तामकाशाचेनि दृतिं । चुंबिजे अमृताक्षरें ॥
मन ठेउनि अतारिं । इंद्रियें घालुनि बाहेरि ।
बुद्धि चित्त आइ हें सारीं । निपटुनियां ॥
एवं शुद्ध होउनि स्वप्रकाशा । आळगीजे तें परिमेसा ।
जेवि आकाशिं अवकाशा । तादात्म्य मावो ॥
तैसा आत्मभावें भरला । मह्मगोळ कोंदाटला ।
बाहेरि भीतरी उरला । पुरोनियां ॥
तें चि पुरोनि उरलें । मया माव अनुभवामृत बोलिलें ।
10] जेवि चद्रें उमजविलें । चकोरांसी ॥
तेवि ' त्वं तदसि ' कथन । केलें मह्मनिरूपण ।
जेवि वेदांतार्थ मथन । उपनिषदार्थी ॥
तें सकळ शास्त्राचें सार । वेदांताचें गहिंवर ।
पुराणींचा विचार । विचारिजो ॥
जें सकळांचें निजधन । सकळ प्राणीयेचें निज ज्ञान ।
ज्ञेयातीत आनंदघन । सत्तामात्र जें ॥
जें सकळ ध्येयाचें ध्येय । सकळ लयाचें लय ।
सकळ पो × यें ये (!) य्य । स्वयंपोप्य जें ॥
जें सकळ ध्यानाचें ध्यान । सकळ ज्ञानाचें ज्ञान ।
20] सकळ अंजनाचें अंजन । निरंजन जें ॥
जें सकळ दृशाचें दृश । सकळ रहस्याचं रहस्य ।
सकळ प्रकाश्याचें प्रकाश्य । स्वप्रकाश जें ॥
जें सकळ गुणाचें गुणोत्तम । सकळ निरुपमाचें निरुपम ।
गुरुशिष्याचें गुजात्म । अनुपम्य जें ॥
तें चि ये ग्रंथीं प्रगुप्त । जे बोलिले होते श्रीनिवृत्तिनाथ ।
तो चि अनुभवामृतार्थ । ज्ञानदेवो म्हणे ॥
ॐ तत्सदिति श्रीमथ परिपुर्ण । पुर्णपणें ग्रंथ प्रमाण ।
बोधियाचें अनुसंधान । संपुर्ण जालें ॥

10] या ओवीबद्दल विशेष चर्चा करण्याची मला इच्छा नाहीं, तथापि अनुकूल प्रतिकूल एक दोन गोष्टी येथं नमूद करून ठेवणें इष्ट वाटतें १ शिवकल्याण्यां

आपल्या टीकेत अनुभवामृताच्या ८०० आठशें च ओवी आहेत म्हणून स्पष्ट नमूद केलें आहे माझ्या या पोथीत ओवी ८०२ असून शिवाय या वर दिलेल्या अधिक आहेत इतर सर्वत्र ८०६ अगर ८०८ इतक्या आहेत म्हणजे मी वर नमूद केलेल्या अप्रसिद्ध ओवी सोडल्या तर माझे पोथीत ८०२, कुटथाचे प्रतीत ८०४, विष्णुबोवाचे प्रतीत ८०६, व इतरत्र ८०७।८०८ इतक्या ओवी आहेत

शिवकल्याणाचा काल त्याचे च कथनावरून १५५७ चा शक सुमार आहे. ( अमृतानुभवावरील टीका सपली श्रीपढरपुरे येथें शक १५५७ युवा सवत्सर ). एकनाथमहाराजानी श्रीज्ञानेश्वरी शक १५०६ तारण सवत्सरी शुद्ध केली, व तीत फेरफार केला तजावर येथील शक १५१६ तील श्रीज्ञानेश्वरीत,' ज्ञानेश्वरीपाठी । ओवी करील जो मऱ्हाठी । इत्यादि ही ओवी उपलब्ध होत नाही यावरून ) [१० असा च फेरफार जर श्रीज्ञानेश्वराच्या इतर ग्रथात हि त्यांनी केला असेल तर शिवकल्याणानी शक १५५७ मध्यें

> यावरी भाषा ओवीबद्ध । अष्टशत मूळ प्रबध ।
> तो दहा प्रकरणी विविध । विवरिला ग्रथु ॥ ८ ॥

असें विधान करणें अशक्य नाही.

धुळें, आषा॰ शु॥ १०/३५ } गो॰ का॰ चांदोरकर

---

## १९ श्रीतुकाराममहाराज यांचें सदेहप्रयाण

चमत्काराची परपरा आमचे कडे उपनिषद् कालापासून आहे निदान त्या काळच्या उल्लेखाचा अर्थ चमत्कारदर्शक आहे अशी आज समजूत आहे जड भिंती चालविणें, पशू कडून वेद बोलविणे, व सदेहप्रयाण करणें, हे अर्वाचीन कालचे[२० चमत्कार आहेत. या चमत्कारांची वर्णनें अनेक सतानी परोपरीनें दिली आहेत तथापि त्यांच्याबद्दल निश्चय कधी होईल की नाही हें अनिश्चित आहे. या साधु - सताच्या पुराव्याच्या ग्राह्याग्राह्यतेत व्यक्तीव्यक्तीच्या मनोरचनेचा पुष्कळसा भाग असल्यानें मला वाटते असले चमत्काराचे प्रश्न नेहमी सदिग्ध च राहणार.

तुकाराममहाराजाच्या सदेह प्रयाणाचे बाबतीत साधकबाधक अनेक पुरावे मागें येऊन गेले व हल्ली येत आहेत.

प्रथम तो पाय घातला पाण्यांत । " तुका म्हणे " मात । राहिली ते ॥

यावरून श्रीतुकाराममहाराजांनीं परीच प्रयाण केलें व त्यास तत्कालीन साधूंच्या पद्धतीस अनुसरून, कृत्रिम विमानांत घालून जलसमाध दिली, असें एक मत आहे त्यांनीं आपण ज्ञानेश्वर, श्रीनाथ वगैरे संतांनीं जो मार्ग आक्रमिला त्यास अनुसरून देहूचे डोहांत जलसमाध घेतली असें दुसरे प्रतिपादन करतात. महाराज " तीर्थयात्रेस निघून गेले " याचा हा अर्थ घेऊन, बरोबर च ते तीर्थयात्रेस गेले असा कित्येकांचा तर्क आहे तर दुसरे म्हणतात कीं, महाराज गुप्त झाले, व हे सब भिन्नमतवादी आपापल्यापरीनें साधक बाधक प्रमाणें देऊन या चमत्काराचा ऊहापोह करतात मला वाटतें शक ११०० पासून शक १५४० [१०]पावेतों आज उपलब्ध झालेले ग्रंथ ( संतांच्या कृतीचे बाबतींत ) अनुपलब्ध अशा ग्रंथांच्या मानानें अत्यन्त थोडे आहेत, व त्या च मानानें ज्ञानाचा परिघ हि संकुचित आहे तेव्हां या काळांतील आपलें कर्तव्य अशा सहज श्रद्धा न बसणाऱ्या गोष्टींच्या बाबतींत अथवा इतर बाबतींत होईल तितका साधकबाधक पुरावा नमूद करून ठेवण्यापलीकडे कांहीं नसावें कारण हा पुरावा जसा जसा चमत्काराच्या काळाचे जवळ जवळ जाऊन पोहोंचेल तसें तसें आपलें तत्संबंधीचें ज्ञान निर्दोष होऊन सद्गुरु प्रमेयें हि बिनचूक होतील कोणत्या पुराणगोष्टीवर आज च शेरा मारण्याची घाई कां म्हणावी । आतां कोणतें हि ज्ञान सान्त नाहीं हें जरी खरें आहे तरी पण ही त्याची अंतिम सीमा ध्यानांत घेऊन अपक्व ज्ञानावर हि इमारत उभारणें हि अयुक्त आहे तथापि वर नमूद केलेल्या ६०० वर्षांच्या कालासंबंधीं [२०]निराश होण्याचें हि आतां कारण नाहीं, कारण चिन्हें स्पष्ट दृग्गोचर होताहेत संशोधनाचें काम करण्याची सुशिक्षितांस स्फूर्ति होऊं लागली आहे व ज्या कालाचें संशोधन करणें आहे तो राष्ट्राच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे व तसेंच तो काल हि पण अत्यंत पुरातन नाहीं तेव्हां कोणत्या हि दृष्टीनें निराश होण्याचें कारण नाहीं व तसेंच अधीर होण्याची हि आवश्यकता नाहीं असो म्हणून महाराजांच्या प्रयाणासंबंधीं अगदीं तात्कालीन असा एक पुरावा मी आज नमूद करून ठेवीत आहे आजपर्यंत उपलब्ध व प्रसिद्ध झालेला असा साधकबाधक पुरावा जरी कोणी एकत्र संकलित करील तरी सुद्धां त्यानें सारस्वताची एक मोठी कामगिरी बजावली असें होईल आज मी जें काय आपल्यें पुढें ठेवणार आहें तें एक पद आहे

[३०] हें पद विठ्ठलनाथाचें आहे विठ्ठलनाथाचा शककाल प्रत्यक्ष असा कोठें हि दिलेला माझे पहाण्यांत नाहीं पण तो आपल्याला शोधून काढण्यास साधनें मात्र उपलब्ध आहेत विठ्ठलनाथाची एति प्रसिद्ध काव्य थोडीं, म्हणजे नाहीं १०

पदें आहेत. उपलब्ध मात्र त्या मानानें बरीच जास्त आहे. त्यांपैकीं **'अश्वमेध'** नांवाच्या ग्रंथांत त्यानी असें म्हटलें आहेः—

सद्गुरू माझा गणेशनाथ सारशात राहतो ।
ऐका रसाळ अश्वमेध विठ्ठलनाथ गातो ॥ २६ ॥

यावरून या विठ्ठलनाथाचे गुरु सारशात राहणारे गणेशनाथ कोणी होते हें उघड आहे. या सारशातील गणेशनाथाचा उल्लेख महिपतिबावा व भक्तमंजिरीकार राजारामप्रासादी यानी दोघानी हि आपले ग्रंथात स्पष्ट केलेला आहे. पैकी महिपतिबावाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. व भक्तमंजिरी ही फक्त उपलब्ध आहे. महिपतिबावा आपल्या भक्तिविजयाच्या ५५ वे अध्यायांत गणेशनाथासंबंधी उल्लेख करतात कीः— [१०

" गणेशनाथ हे सारसी उज्जन बालेघाटीचे नाथपथी. शिवाजीराजे पंढरीस असता वृक्षांस उपदेश करताना गणेशनाथ त्यांस आढळले "

या उताऱ्यावरून गणेश नाथांची वर ओळख पटलीच परतु त्यांचा काळ हि कळला हे समर्थकालीन होते याबद्दलचा पुरावा भक्तमजिरीकार हि देतात.

राजारामप्रासादी यानी केशवस्वामी भागानगरकर याचें चरित्र वर्णन केलें आहे त्यांत त्यानी असा उल्लेख केला आहेः—

पढरीस होणाऱ्या स्वामींच्या कीर्तनास रामदास (श्रीसमर्थ), रगनाथ, निरजन, गणेशनाथ हे येत असत.

यावरून महिपतिबोवा व भक्तमजिरकार याची दोन गोष्टीत एकवाक्यता आहे [२०

पहिली गोष्ट अशी की ' नाथगणेश ' हे श्रीशिव अथवा श्रीसमर्थकालीन होते व दुसरी गोष्ट ही की त्यांचा वास कांही काल पंढरीत होता.

इतका भक्कम पुरावा मिळाल्यानतर आतां गणेशनाथांचें समर्थकालीनत्व आणि विठ्ठलनाथाचें व त्यांचें गुरुशिष्यत्व निःसदेह शाबीत झालें असे म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाही असें माझें मत आहे.

तेव्हां विठ्ठलनाथांनी श्रीतुकाराममहाराजाच्या प्रयाणासबंधी जे काय लिहिलें आहे तें विचार करण्यासारखे आहे हें उघड आहे. आजपर्यंत एक च गणेशनाथ व एक च विठ्ठलनाथ उपलब्ध आहेत, व वरील पुराव्यावरून विठ्ठलनाथास तुकाराममहाराजांचे समकालीन म्हणण्यास कांहीं हरकत नाही.

## विठ्ठलनाथांचे पद

जड देह कसा घेउनि गेला तुकाराम वाणी ॥ ध्रु० ॥
भजन पूजन भावबळें । जिंकियलें कलि काळ ।
गजताति तिन्ही ताळ । ऐकताति कानीं ॥ १ ॥
पंढरिचा देव गडि । पावचील पैल थडि ।
विठ्ठलनाथ गरिब गडि । त्यासि कोण मानी ॥ २ ॥

'जडदेह टाकून' आम्ही सर्व आतं व आजपर्यंत सर्व गेले 'जड देह घेऊन' गेला हें सांगण्यांत कांहीं विशेष असल्याशिवाय त्याचें मुद्दाम कोणी वर्णन करणार नाहीं. जलसमाधि घेणें हें आम्हांस आज जरी चमत्कार वाटणारें आहे तरी पेशव्यांच्या १०] काळाकडे जो शोध करील त्यास असें दिसून येईल कीं त्यावेळीं जलसमाध घेणें हें कांहीं आश्चर्याचें नव्हतें. तेव्हां तुकाराममहाराजांनीं जलसमाध घेतली हें विठ्ठलनाथांस कांहीं इतकें अभूतपूर्व नसलें पाहिजे कीं, ज्यायोगें त्यांनीं इतर साधु संतांच्या जाण्यांत व तुकाराम महाराजांच्या प्रयाणांत एवढा विशेष पडावा कीं तें प्रयाण त्यांनीं मोठ्या प्रेमानें गावें व तें हि 'जड देह घेऊनि गेला' या शब्दांनीं गावें.

पण मीं जें हें पद वर दिलें आहे तें एका समकालीन संताचा पुरावा म्हणून दिलें आहे. या प्रश्नाचें समर्थन अथवा खंडण करण्याचा माझा हेतु नाहीं.

धुळें, }
ज्येष्ठ व. १८३५ }

गो. का. चांदोरकर

२०] 

## २० चोंभाकवि व संत

मराठ्यांच्या शक १८११ च्या अंकांत या कवीच्या उपाख्यान काव्यांपैकीं कांहीं मुद्रित पद्यें छापलीं गेलीं तेव्हां या कवीचें नांव आधुनिक महाराष्ट्रांत प्रथम ऐकलें. श्रीसमर्थांच्या वेळेपर्यंत हा कवि महाराष्ट्रास पूर्ण ठाऊक होता. पण पुढें आपणास त्याचा विसर कसा पडला कोण जाणें! शक १६०८ त दत्ताराम हा चोंभा गेले. त्यांना चोंभा कवीची पोथी ओळख होती. चोंभा हें तुमचें कवि म्हणून संत हि होते. त्यांचा निर्देश रंगनाथस्वामींनीं आपल्या संतमालिकेंत केला आहे. हीं गोष्ट रा. पोतदार यांनीं आपल्या मजरेस आणली व आहे. रा. रा. राजवाडे

यानी देवदासकृत सतमालिका काही वर्षांमागे ग्रथमाला मासिकांत प्रथम छापली व रा पोतदार यानी निराळ्या प्रतीवरून सदरहु मालिका स्वतत्र पुस्तकरूपानें गेल्या चैत्रात छापली या सतमालिकेच्या हस्तलिखित प्रती बहुतेक रामदासी मठातून आढळतात देवदासाच्या पश्चात् या प्रती काही फार वर्षांनी झाल्या नाहींत. असे असता प्रती करणाराच्या हातून पुढील चूक कशी झाली याचे नवल वाटते.

सदरहु सतमालिकेच्या ७३ व्या ओवीचे प्रथम चरण रा राजवाडे व रा. पोतदार याना मिळालेल्या प्रतीत खालीलप्रमाणे आहे

राजवाडेप्रत.— चाव भाव काम उवेश ।

पोतदारप्रत.— चाऊ भाउ कामेहेश ।

आणखी एक प्रत उदाहरणार्थ घेऊ डोमगाव मठातील बाड अनुक्रमांक १८[१० यात वरील चरण असा आहे:—

डोमगावप्रत:— चावभावकामधेश ।

वरील सर्व प्रतीनी थोडथोडया चुक्या करून आज आपणास कसे घोंटाळ्यांत पाडले आहे आपण आता रा राजवाडे याचा पाठ उदाहरणार्थ घेऊ.

चाव भाव काम उवेश ।

यात " व " च्या ठिकाणी पोतदार प्रतीतील " उ " व " वे " च्या ठिकाणी डोमगाव प्रतीतील "धे" घालून जरा निराळ्या रीतीने पदें पाडली म्हणजे

चाउभा उका मउधेश ।

असा पाठ मिळतो आणि हा पाठ आता

चोभा येका मुधेश । [२०

असा वाचावयास काही हरकत आहे काय ? आणि तसा च तो तजावर—भीमस्वामीच्या मठातील बाड अनुक्रमाक ६ यांत आहे

अशुद्ध पाठामुळे अर्थाचा अनर्थ कसा होतो, याचे हें एक गमतीदार उदाहरण आहे

शेवटी मला इतके च म्हणावयाचें आहे की, श्रीएकनाथाच्या हि पूर्वी होऊन गेलेल्या या सतकवीविषयी पूर्ण शोध करण्याची ईर्षा सशोधकाना वाटली पाहिजे व हे चोभा कोण होते, कोठें व केव्हा होऊन गेले, त्यांनी कोणकोणते ग्रथ केले इत्यादि माहिती सशोधकाच्या मडळानें महाराष्ट्रास करून दिली पाहिजे.

श श्री. देव

( संस्काररत्नमाला ग्रन्थाचे कर्ते )

## २१ गोपीनाथ दीक्षित ओक यांचें एक पत्र

" श्रीः

श्रीमद्रामोपासिनामाश्रितरिपुदलनोंगारकोपाभिधानो
राज्ञा दत्ता तु यस्मै सरसिलपदवी शोभते तत्पदव्या ।
शौर्योदार्यायनेकैर्विविधगुणगणे शोभमानः प्रभुर्यः
तं त्वां पायादनल्पं तुहिनगिरिसुतानंदनः सिद्धिभर्ता ॥ १ ॥

स्वस्ति श्रीमद्रमोमारमणभजनपराय
णासीमानुपमसद्गुणगणमंडित सत
१०] तविविद्वद्वृंदप्रतिपालक धर्मस्थापक सर
देलाभिधपदवीविराजमान अंगारकोपा
भिधानक रघुनाथाभिध प्रभुवर्येषु

कृपेषु गणपपरुशपीयूषरसास्वादेषु क्रोकोपाख्य गोपीनाथ दीक्षितस्तानेक
आशीराशितनयः समुल्लसंतु विशेषस्तु पौष शुक्ल प्रतिपदवधि यथातथ्यवर्गतम्यं
उदंतस्तु मापथा पत्रलेखन कारण ऐसें जे आमचा चित्तामध्यें हें कीं श्रीमत्क्रतुदर्शन
घ्यावें यानिमित्त आपल्या प्रांतांत यावयाविषई चित्त उद्युक्त आहे यास प्रस्तुत यावें
तर अग्निहोत्र स्वीकार करून संवत्सर संपूर्ण जाहाला नाहिं येत्र शुद्ध अश्वीत
संवत्सर होतो संवत्सर संपूर्ण जाहाल्यावांचून आपसिविना सीमातिक्रम करून यानां
न ये यास्तव प्रस्तुत येतां न ये प्रस्तुत आपत्ति हीं नाहिं करावें अनारी विशेष वे॥
२०] ब्राह्मण अग्निहोत्री हे पुण्यामध्यें आले यांची हीं भेट जाहाली फार थोर शिष्ट सदा
चारादिसंपन्न ज्या विषयानिमित्त ते पुण्यास आले तो विषय ध्यानास आला
श्रीमन्याचे येथें श्राद्धादिविषई कार्यामध्यें सकल शिष्टांची प्रवृत्ति आहे
तथा अग्निहोत्र्यांनी तीं प्रवृत्ति पाहून तुमचे ग्रामीं ही अशी च प्रवृत्ति ही आहे असे
श्रावणामध्यें आहे असें असतां दोनाभेगाचा संबंध नाहिं म्हणून लिहिलें असे कृपा
प्रभुंप्रति बहुत काय लिहिणें निरंतर कृपाभिवृद्धि करीत असावें हे अनेक आशीर्वाद

× × ×

असें एक ब्राह्मणोय अस्सल पत्र सहजास एका सद्गृहस्थाकडे मिळालें गोपीनाथ
दीक्षितांचे वैदिक ब्राह्मणांवर अनंत उपकार आहेत, तेव्हां त्यांचें हे पत्र वाचण्यांत
हि एक प्रकारचा आनंद आहे

पॅत्रावरून शकाचा निर्णय होत नाही तें रघोजीराव आंगरे यांस लिहिलेलें आहे. रघोजीरावांची कारकीर्द शके १६८० पासून १७१५ पर्यंत होती व दीक्षितानी हि आपला सर्वमान्य ग्रन्थ शके १६८७ त संपविलेला आहे. या पत्रावरून पुढील बोध होतो:—

( १ ) रघोजीराव आंगरे यांची योग्यता त्याना दिलेल्या विशेषणांवरून कळते.

( २ ) गणपति हें दीक्षितांचें इष्ट दैवत च होतें. तेव्हां वक्रतुंडदर्शनाविषयी त्यांना आतुरता वाटणें साहजिक आहे.

( ३ ) चैत्र शुद्ध अष्टमीस दीक्षितांनीं अग्निहोत्राचा स्वीकार केला होता.

( ४ ) अग्निहोत्र घेतल्यानतर एक संवत्सर आपत्तीविना सीमातिक्रम करू नये.

(५) दीक्षित नेहमी काशीस असत, पण त्यांनी पुण्यास येऊन अग्निहोत्र घेतलें [१०

( ६ ) थोर शिष्ट सदाचारादिसपन्न ब्राह्मणाना रघोजीरावांचा आश्रय असे व अशा ब्राह्मणांपैकीं च वे. शा स. बाळंभट्ट अग्निहोत्री हे एक होते.

( ७ ) शेणव्यांच्या येथें श्राद्धादि विधि करावा कां न करावा असा चउलास वाद पडला होता.

( ८ ) अशा धार्मिक वादांचा हि निर्णय त्या काळीं पेशव्यांच्या राजधानीस होत असे.

( ९ ) शेणव्यांचे येथे श्राद्धादिविषयी काशीमध्यें सकल शिष्टांची प्रवृत्ति होती

(१०) कुलाबा प्रांतांत हि तशी प्रवृत्ति होती.

(११) प्रस्तुतचा वाद अकारण आहे असें दीक्षितानी ' सूचनार्थ लिहिले असें.

या पत्राचा रा. राजवाडे याना हि थोडासा उपयोग होणार आहे. मडळाच्या[२० गेल्या वार्षिक समेलनप्रसंगी रा. राजवाडे यानी "भारतीय आर्यवंश" म्हणून एक अत्यत उपयुक्त निबंध वाचला होता गोत्रनामांवरून आडनावें कशी पडली असावी याचे सदरहु लेखांत त्यानी केलेलें विवेचन अगदीं नवीन आहे त्या निबंधांत "आगरे" हें आडनांव "आंगिरसाः" या गोत्रनामावरून निघाले अशी उपपत्ति त्यांनीं गोत्र १७४ वें व १४२ वें या दोन ठिकाणीं दिलेली आहे. परंतु वरील

१५ तेला ताँबियें तिनि समंध सोळासिया ५१ तिळेल नाहिं तरि नारलेळ अथवा तुप मेजुनु देउळिं या-

१६ वें तथा दिपमाळेसि पणतियां ४०० वातिसि ळाँग तेतुकें सुत येतुकें गोपाळभटानें देउनु दिपमा-

१७ ळ करावि श्रीनागनाथदेवासि रात्री महा[32]पनगंधधूपदीपउपाहारा[33] तांदुळां[34] चौथें[35] २ तुप सोळ-

१८ सि १ ॥ पक्वंना[36] वडे [37]कां [38]घारीया ८ [39]शाक २ विडा १ श्रीमहालक्ष्मी देवीसि अभिसेकु गंधधूप-

१९ दीपउपाहारासि तांदुळा चौथु ४ तुप गिदुं[40] १ पक्कीन[41] वडे ४ शाक २ विडा १ [42]दोइ देउळि मंत्रअवसे[43]- [१०

२० रु करावा दिपमाळेच्या खांबापासि गिदा २ चा निवेद्यु[44] करावा हेयाँ[45] येतुक्यासिं तथा मांइ सेणवैये

२१ तया गोपाळभटासि तयाच्यॉ दों कुळाग्रिचे टांके ३ ॥ दिधले [46]सैमंधि तथा गोपाळभटाचिये जात-

२२ प्रजातसंततिन आचंद्रार्कपर्यंत चाळवावा तथा दिने नागनाथदेवा-च्या उपाहारा [47]वाँरिये माळि

२३ रउळगिधूर्[48]वाँळिमरत्यान दों [49]वेर्गि दिपमाळ जळावी तयाच्या जात-प्रजातसंततिन दिपमाळा ज-

२४ ळावी तथा ग्रामान तया माइ सेणवैयासि कुरुपाँग्रासिवाडे [51]रुवो कु-ळाग्र १ नाँ[52]गझरि मळो सेत १ दत्तभु- [२०

२५ मि दोनि देंता [53]कुंग्राचे माइ सेणवैया हस्तें ग्रामानं टांके ५० घेउनु सहिरंण्योदकदानधारापूर्वक सर्व-

---

३१ लाग = लागे. ३२ महास्नान. ३३ उपाहारास,] चतुर्थी. ३४ तांदुळां = तांदुळाच्या पष्ठी ३५ चौथ हें एक माप आहे चौथ्या हिश्शाचें माप. ३६ पक्वान्नें ३७ किंवा ३८ घारगे. ३९ भाजी ४० गिदु हें एक माप होतें, गिडी. ४१ पक्वान्न द्वित्त न्न हवा ४२ दोही ४३ मन्त्रावसर ४४ नैवेद्य. ४५ ह्या हेया, एया, ही जुनी ज्ञानेश्वरी रूपें १३३५ प्रचलित होती च फक्त तया हें रूप प्रचारांत येत चाललें होते इतके च ४६ सर्वांनी ४७ ? ४८ ? ४९ दोघां जणानी. ५० वाडीचे नाव ५१ रुवो हें कुळागराचें नांव ५२ नागझरी हें मळईचें नांव. ५३ ळा मध्यें खोदावयाचा राहिला आहे. [३०

ंयाधाधिवर्जित करुनु ग्रामानें माइ सेणवैयासि आचंद्रार्क
ालें ॥

ासेणवैपें आपुलें भक्तिपूर्वक रुवो कुळाग्र श्रीनागनाथदेवासि
ळें आटवें-

उपाहारासिं प्रतिदिवसिं । ६ पौ १ फौं हुरे सडिक तांदुळ
ळेसिं करउंचिप भासे

। कुळाग्र मोळीतिवाडे लखुम सेणवैयासुत विठल सेणवैयासि
ातप्रजा-

ते आचंद्राकपर्यंत दिधलें नागझरि मळो सेत श्रीमहाळक्ष्मि-
ातका-

वळीपच्या उपहारासि दिधलें समर्पि तथा देवतेच्या पुजा
ग क्षत्री घेउ-

सि अभिषेकुगंधधूपदीप हुरे सडिक तांदुळ गिदा १ ळसि
करावा विडा

द करावा तथा उपाहारु वर्तोरियासि । हा केला धर्मु प्रा
ळवावा सिंहास-

ार्यीन अधिकारिया मळितियीन पाळावा हा केला धर्मु जो
ग वारीणे-

ोस्वेस्वरा सामिपि स्वयम्हाणि आपुला मातापितामाप चदि-
ासि जाप

नयोर्मध्ये दानोच्छ्रेयामुपाळन । दानात्स्वर्गमवाप्नोति पाळना

---

ेस आग्रून पी पेज व्यापपापी तिला आग्वत। म्हणमान ५५ ।
म्हणजे म उकरल्हे सादूष ५८ सादुरो दही दान्हा राद्दा
आहे ५९ करण्याकरितां ६० पाहाचें माव ६१ शेत ६२
पूजाहारां = पूजा।। ६३ देपरायानें ६४ अधिकार करण्यानें
। प्रतिनिर्धानें ६५ सनमां ६६ आइ,बाप व गाम ६७ वधित्सा

३७ पदं ॥ सामान्योयं धर्मसेतुर्नृपाणा काले काले पालनियो भवद्भिः
३८ सर्वानेतां भाविनः पार्थिवेद्रां भूयोभुयो याचते रामचंद्र
३९ स्वदत्तां परदत्तां वा यो हरेच्चं वसुंधरां षष्टीवर्षसहस्राणि वि
४० ष्टायां जायते कृमि ॥ तथा उपहारु आणितां प्रीक्ष देवाचे उ-
४१ ळिगाचे माणुसि उळिग करुनु उपाहारु न्यावा ॥ श्रीशुभं
४२ भवतु श्री ॥

वि. का राजवाडे
द. वि. आपटे

श्री

## ४० कोडीत येथील एक सनद [१०

सोबत 'शुहूर सन ११०१ शव्वाल'ची एक सनद पाठविली आहे फिरंगी '१७०० अक्टोबर' हा काल येतो श्री छत्रपति राजाराम महाराज हे शक १६२२ त परलोकवासी झाले ते मार्च महिन्यात निवर्तले असें ग्राटडफ ह्मणतो यावरून त्यानंतरची ही सनद आहे

या काळी मोगलांची शिस्त किती बिघडली होती, मोगली सरदार नीतिदृष्ट्या किती भ्रष्ट झाले होते, भावी स्थितीच्या कल्पनेनें उत्पन्न होणारें औदासिन्य व तद्धून आलस्य याचा त्याचेवर किती पगडा बसला होता, याचे वर्णन ग्राटडफनें केले आहे अशा 'बेबंद' शाहीत धाडशी माणसाचें फावतें

पुढे दिलेल्या सनदेंत मोंगली राज्यव्यवस्थेचा एक लहानसा मासला आहे, तो अज्ञान व मनरजन करणारा असल्यानें दिला आहे विशेषतः तो 'खान-[२० देशी' आहे

श्री

मौजे कोडीत तो शिरपूर येथील सनद
( वर सर्व फारशी त्याचा तर्जमा मोडी )

जोकर कवसदर पस्तानराय सीके करासिया मौजे कोडित मामुदाप्रगणें थाळनेर मजमजाफ सुभे खानदेस सरकार असर अन आबाद गुजपद दर मौजे वनावल आमला प्रगणे मजकूर सकुनत राहणार दास्त मुदामअन हाकाम प्रगणे मजकूर

६९ मा वर बिंदू निरर्थक. ७० नी हवी ७१ ता वर बिंदू निरर्थक ७२ नू बद्दल बिंदू. ७३ च हवा. ७४ पि हवी. ७५ रु हवा ७६ नंतर.

आज रयत सकुनत मोजे कोडीत मामुल राहणार असोन तेथें राहण्यास अजारी व चास्याचे उपद्रवामुळें सब मेत जार्ले राहिलेले मुले येका मोजे वमावल येथे आले पादशाकडून नेग करून मौजे कोडाम पर्यें कांहीं लोक घेऊन येऊन राहिला आगे आपला हुम चालउ चालला हुसेन याचे सानी उ × आसा या मावामी हुदा चालउ लागला आणि गावास मौजे कोडित हा गाव चांगला आषाद् करून त्या गावांत मसिदी वगैरे बांधून तेथे राहिला आणि आपला सर्व कबजा करूं लागला तेव्हां गोपजी पा वाघाडीकर हा त्यास हे काम करण्याविसि ताकीद् देत असत त्यावर त्याणीं ऐकिले नाहीं जे बेव्हेस गोपजी पा मना करीत होता त्या वेळेस त्याणी लढाईचा इरादा कगवा आणि त्याणी आपल्या मनांत मी कोण सरदार आहे असे
१०]समजून कोणास मान करून आरादिन पाहाराने सानी व ममघुक हा त्याचा मोठा सरदार सामीचा होता असे दोघे वआणसीन कांहीं लोक जमा करून सर्व आपला हक चमाउ लागला नंतर जावजी ( मावजी ) पा वाघाडीकर यास धरून धारुनेर येथें किल्यांत पोहेचऊन दिल्हे मंतर अजुबाजूचे गांव लुट लागला त्यामळे गावे यहुनेक उज्याड जाले व मारा दंगा करू लागला नंतर पादशाहाकडील हुदेदार परमनाय डोंगरी व सोनगीर व पजावडू येथें आले म्हणून गोपजी वा वघुजी पा हे डोंगरी व येनावद् व सोनगीर येथे पादशा कडील अनेक सरदार यास भेटून त्यास मोजे कोडीत येथील सर्व मजकूर सांगितला मंतर धारुने रचे मुकामी सर्व बेहरानखाचा चर्समाम करविला त्यावरून त्याणी रघुनाथराव देशपांडे धारुनेरकर व त्यासमयरोयर कांहीं लोक लढाउ त्यासमयरोयर देऊन हुा
२०]दिला मौजे कोडीत येथें जाऊन त्या दंगे खोरास ठार मारावे नंतर रघुनाथ देशपांडे धारुनेर येथून निघून मोजे वाघाडीस येऊन तेथें गोपजी वघु पा यास जमावनिसी बरोबर घेऊन चढाई केली त्या लढाइत कोडीत येथे कापाकापी करून त्यासकडील फौजदार सरदार मोग होता त्यास रघुनाथ व गोपजी योगीं गार मारिला आणि थोडे लोक जखमी जार्ले नंतर दुसरे दिवशीं मौजे कोडीस यावर चढाई करून तेथे काही लोक रघुनाथ व गोपजी याणी त्यास कळविले की तु मावजी (जावजी) यास आता सोडून दे त्यावरून त्याणी सोडले नाही मी लढाईस तयार आहे मंतर लढाइ सुरू करून थोडे दिवस चालली त्यात वघु पा हा मेत जाला नंतर गोपजी याणी मोठी कतल करून कोडीत हा गांव अपले कबज करून येरसोर लोक सब पळून गेले मंतर गोपजी याणी सरकारला मोठी मदत दिलि करितां हि समद दिल्ही आहे
३०] सन ११०१ मा १ माहे शव्वाल

गो वा वाघाडीकर

# ४१ छत्रपति संभाजीच्या कारकीर्दीतील अव्यवस्था

सोबत जोडलेले पत्र छ ७ साबान खमस समानीन अलफ ह्मणजे शक १६०६ श्रावण शु॥ ८ मीस मोरेश्वर पडितराव याणे लिहिलें तें बार तिसा समानीन अलफच्या ५ जिल्हेजला ह्मणजे शक १६१० आश्विन शुद्ध ७ स झाले ह्मणजे बार व्हावयास ४ वर्षे २ महिने लागले सभाजीला अवरगझेबानें शक १६१० च्या श्रावणात मारिले तद्नतर थोड्याच दिवसानी पत्र बार झालें. याचा अर्थ असा होतो की शक १६०६ पासून शक १६१० च्या श्रावणापर्यंत ह्मणजे सभाजीच्या समाप्तीपर्यंत सभाजीचे दफ्तर अव्यवस्थित होते त्यांत व्यवहाराची दाद लागत नसे संभाजी वारल्याबरोबर लगे च व्यवस्था सुरू झाली उघड च आहे, कबजीबावा अस्तगत झाल्याबरोबर सर्व प्रधानमडळी आपापल्या कामावर[१० रुजू झाली व व्यवस्थित व्यवहार पुनः शिवाजीच्या कारकीर्दीतल्याप्रमाणें चालू झाला सभाजी शक १६१० च्या माघात किंवा फाल्गुनात मारला गेला वगैरे गप्पा कित्येक टिपणकारानी मारिल्या आहेत, त्या अर्थात् अविश्वसनीय आहेत सभाजी शक १६१० च्या श्रावणात मारला गेला हें विश्वसनीय आहे अस्सल पत्राची नक्कल येणेप्रमाणें:—

श्रीशकर

शक १६०६ अधिक श्रावण शु॥ ८

श्रीसकलगुणमडितअखडितलक्ष्मीअलकृतराजमान्य राजश्री देवाजी विठ्ठल देशाधिकारी व लेखक प्रात राजापूर वर्तमान व भावी गोसावीयासी [२०

पोष्य मोरेस्वर पडितराई नमस्कार राज्याभिसेक सक ११ रक्ताक्षीनामसंवछरे श्रावण शुध अष्टमी ब्रसपतीवार वेदमूर्ति हरिभट विश्वनाथभट पटवर्धन वस्ती मौजे पावस ता मा ब्राह्मण योग्य देखोन धर्मादाय देविले तादूल केली कोठी मापें मण ८२॥ अडीच जोवरी वेदमूर्ति क्षेम पावतील तोंवरी प्रतिवर्षी परामर्ष घेउनु प्रविष्ट करीत जाणे प्रतिवर्शी नूतन पत्राचा आक्षेप न करणें प्रती लिहून घेउनु

२३

मुरुय पत्र मन गोसावी याजवळी देणे रा छ ७ माहे शायाम झाा समस समाननी

मलक पा हुजूर हे विज्ञाप्ति

पार सूद छ ५ जिल्हेजु सन तिसा समानीन

पार सूद

पो छ १९ जिलकाद

साल मजकूर *

## ४२ तळेगांव ढमढेरे येथील श्रीमभुनाथबावा

१०] तळेगांव-ढमढेरे, ता शिरूर जि पुणें येथें जीं कांहीं मेसगीय देवालयें आहेत, त्यांसंबंधानें मुद्रित माहिती देवालयांवरील शिलालेखांच्या आधारें भा इ सं मंडळापुढें वाचण्यात आली आहे व ‡

वृत्तांत उल्लेखिलेल्या पांच देवालयांशिवाय येथें आणखी एक प्रसिद्ध देवालय आहे ई देवालय म्हणजे वेळ नदीचे कांठीं व असलेलें ' नाथों ' चें देवालय होय या ठिकाणीं एका च आवारात श्रीविश्वेश्वराचें देवालय व नाथपुवांची समाधि अशीं असून देवालय 'नाथां'च देवालय या नांवानें व संबोधिलें जात ई नाथाचें देवालय, किंबहुना नाथपुवाचा काळ याविषयीं अनेकांचे अनेक गप्प आहेत कोणी कोणी तर हे नाथपुवा शालिवाहन शकाच्या मेराव्या शतकांत होऊन गेल्याचें ग्राक प्रतिपादितात परंतु हा निव्वळ तर्क आहे ज्या बावाच्या नावाचा २०] पहम देवालयास नाथांचें दुवालय असें नामाभिधान मात्र झालें आहे, त्या बावास तळेगांव येथील मोकदम व समस्त ब्राह्मण यांनीं शके १६९१ व्यय वर्ष, मंगळवार, ता २०।६।१७६९ रोजीं दिलेल्या इनामपत्रावरून या नाथपुवांचा काल

---

* हें पत्र अगमुरें यर्थ पुराणिक गाडगिळांच्या येथं सांपडलें

( शके १८३४ चा अहवाल, पान २७६ पहा,)

निश्चित होतो. सदरील बुवांचें उपास्य दैवत 'श्रीकाशीविश्वेश्वर' असल्यामुळें, साम्प्रत दर शिवरात्रीस तेथे मोठ्या थाटानें होत असलेला उत्सव शके १६९१ चे पूर्वीपासून च चालत आला असला पाहिजे ह्या माझ्या अनुमानास समर्थक असा पुरावा इनामपत्रातील 'शिवरात्रीचा उत्साह साल दरसाल तुमचे मठी होतो' ह्या उल्लेखावरून मिळतो शिवरात्रीस होत असलेला हा उत्सव अर्थात् शंकराचा असून, शिवोपासक नाथबुवामुळे च, ह्या उत्सवास 'नाथाचा उत्सव' असें म्हणण्याची पद्धत पडलेली दिसते सदरहु नाथबावा जातीनें कासार असून, त्याचें उपनांव 'धुमाळ' असें होते, ह्याशिवाय त्याचेसंबधानें जास्त माहिती मिळत नाही मठांत हि कांही सग्रह नाही. देवालयाचे जीर्णोद्धाराचें काम सांप्रत चालू आहे.

~~~~~~~~~~~~~~

श्रीशंकर [१०

इनामपत्र शके १६९१ विरोधी नाम सवछरे जेष्ट वद्ये १ प्रतीपदा ते दिवसी तपोनिधी श्रीसभुनाथबावा मठ को तळेगाव स्वामीचे सेवेसी मोकदम व समस्त दाही जण कसबे मजकूर ता पाबळ सरकार जुनर सुहुर सन सबैन व आलफ सन हजार ११७९ कारणे इनामपत्र करून दिल्हे ऐसीजे सिवरात्रीचा उछाव साल दरसाल तुमचें मठी होतो व आतीत आभ्यागत येऊन मठी राहानो ऐसा खर्च जाणोन तुम्हास गावनिसबती इनाम येवल थळ पैकी रुके ८६ सजगाणी सिकरापूरचे सिवेस वरुडाचे वाटे खालती गोमाजी माळी भुजबल वाहतो ते जमीन तुम्हास इनाम करून दिधली आसे ते जमिनीत तुम्ही जिराईत बागाईत करून उत्पन्न होईल तें घेत जाणे तुमचे शिष्यशाखा सदरहु इनामाचा भोगवटा घेऊन उछावाचा व मठचा खर्च चालवितील आपणहि वंशपरंपरेने इनाम चालऊ यासी अंतर [२० करणार नाही हे इनामपत्र लेहून दिधले सही

तेरीख छ १५ माहे सफर

निशाणी नागर आमानत

बिा कृष्णाजी सदासिव जोसी
कुलकर्णी को मार

गोही

सुलतानजी चौगुले
सुपेकर को मार

त्रिबंक गोविंद महाजन चेडके को मजकूर
देवजी माळी भुजबळ को मार

सुलतानजी सेटे को मार

पां. न. पटवर्धन

~~~~~~~~~~~~~~

श्रीराम

# ४३ हरिदासांचा सोळा हजारांचा योगवासिष्ठ ग्रन्थ

हा प्रचंड ओवीबद्ध ग्रंथ आपचंद्र मठांत मिळाला तो छापलेला पाहण्यास सांपडेल अशी मला आशा नाहीं। तेव्हां त्याची प्रत करून घेऊन तो मी सद्गुरु मठाकडे परत केला आहे. सम्पूर्ण त्याची माहिती साधुसंतांच्या महाराष्ट्राला करून द्यावी असें वाटून हें टाचण आपणाकडे पाठवीत आहे.

मूळ योगवासिष्ठाचे ३२००० श्लोक आहेत हें सर्वांना माहित च आहे. त्यांपैकीं ६००० श्लोक निवडून काढून त्यांवर कोणा काश्मीरस्थ पंडितानें संस्कृतांत भाष्य केलें आहे. त्या भाष्याचा आधार घेऊन आपण ही टीका करीत आहोंत असें हरिदा १०]सांनीं म्हटलें आहे. हरिदासांची टीका नक्की १६६३१ ओवी आहे, म्हणजे मस्तु तथा ग्रंथ सरासरी एकनाथी भागवता एवढा आहे. त्याचा तपशील येणेंप्रमाणें:—

| | प्रकरण | आधारास घेतलेले संस्कृत श्लोक | सर्ग | ओवीसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | वैराग्य | ३९३ | १३ | २३३२ |
| २ | मुमुक्षु | १४० | ६ | ८२४ |
| ३ | उत्पत्ति | १००० | १५ | ३४५५ |
| ४ | स्थिति | ५४० | ६ | १७२८ |
| ५ | उपशम | १११० | १० | ३ ६२ |
| ६ | निर्वाण | १७४२ | १७ | ५२३० |
| | | ४९२५ | ६७ | १६६३१ |

१०] २१५५६

ग्रंथ अप्रतिम असून प्रासादिक आहे. त्याची यथार्थ कल्पना एखाद्या लहानशा टाचणानें करून देणें कसें शक्य आहे। तेव्हां या टाचणांत ग्रन्थाविषयीं सामान्य माहिती देण्यापलीकडे जास्त कांहीं करतां येत नाहीं. ती माहिती ग्रन्थकाराच्या च शब्दांत देणें बरें.

(१) ग्रन्थकाराचें गांव —

रामकथा सुरस गायन। ते चि हरिदासा जीवन।
गुरुकृपा संजीवन। जाममपान सर्वदा॥ १५॥

शांतानंदाचे अंकित । श्रीरघुनाथ नामांकित ।
हरिदास नाम सद्गुरुदत्त । ग्रंथ समाप्त योजला ॥ ६३ १७/८९ ॥

( २ ) ग्रन्थकाराचें गोत्रः--

उपजलों ज्याचिये वौंसी । नमन तया भारद्वाजासी ।
श्रीराम उपासना मिरासी । म्हणोनि भजनासी विनटलों ॥ १३ १/१ ॥

( ३ ) ग्रन्थ कोठे रचलाः—

गोदातटीं वाल्मीक नगर । जैराम पंडित योगेश्वर ।
त्याचिया सवादें टीका सुंदर । जाला विस्तार ग्रंथासी ॥ ६३ १७/८८ ॥

( ४ ) ग्रन्थ केव्हां रचलाः--

वैशाख शुद्ध सप्तमी । भृगुवासर पूर्व यामी । [१०
सवत्सोळा शत दशमी । ब्रह्मत्व ब्रह्मी प्रतिष्ठा ॥ ६३ १७/९० ॥

( ५ ) ग्रन्थाचे प्रयोजनः--

बत्तिस सहस्र योगवासिष्ठ । बोलिले स्वामी श्रीवासिष्ठ ।
श्रीरामउपदेसी वरिष्ठ । केले अभिष्ट सर्व लोकां ॥ १५ १/३ ॥
त्यामध्यें सा सहस्र । निवडूनि काढिले नवनीत सार ।
त्यावरी आत्मसुख भाष्यकार । जाला विस्तार भूतळी ॥ ५४ ॥
परिव्राजकाचार्य स्वात्मसुख । निरसावया कळिकाळदुख ।
तारावया जड मूढ मूर्ख । टीका सुरेख संस्कृत ॥ ५५ ॥
येथे अधिकारी पावले । संस्कृत वक्के बुझावले ।
बाळे भोळे जन उरले । यालागी प्रेरिलें गुरुदेवें ॥ ५६ ॥ [२०
जयासि वासिष्ठि परम प्रीति । नाही संस्कृति वित्पत्ति ।
तयासि व्हावि अपरोक्ष प्राप्ति । माहाराष्ट्रभाष्योक्ति करि ग्रंथ ॥ ५७ ॥
यैसे गुरु आज्ञापित । तैसे च संताचे हि आर्त ।
वेगिं चालवि वासिष्ठ ग्रंथ । साह्य रघुनाथ तुज असे ॥ ५८ ॥
अतरि चाळक श्रीराम मूर्ति । वाचा वदे त्याचिये स्फूर्ति ।
तेणे चि ग्रथासि अभिव्यक्ति । साशक चित्ती का होसी ॥ ५९ ॥
सर्व भूती भगवद्भावो । हा चि भजनाचा निर्वाहो ।
मीतूपणा कैचा ठावो । येदर्थी सदेहो कायसा ॥ ६० ॥

६ ) ग्रन्थकाराचे गुरु —

आनंदवन वाराणसी । मानससरोवरनिवासी ।
ब्रह्म पोतलें साकार वेषीं । विश्वोद्धारासी शांत मूर्ति ॥ १७/१४ ॥

७ ) शांतानंदांच्या उपदेशाची हातवटी —

उपदेशाची हातवटी । नाहीं लक्ष लावणें दृष्टि ॥
न गोवि नादाचे संकटीं । मुद्रेची गोष्ट कायसी ॥ ६ १७/८० ॥
ध्यान धारणा आसन । न लावी क्रिया कर्म साधन ॥
शुध भावार्थ देखोन । ब्रह्मज्ञान उपदेशित ॥ ३८१ ॥
शिष्य न देखे शिष्यपण । नाहीं गुरूचा अभिमान ।
१०] ब्रह्म सम समान । ब्रह्म परिपूर्ण बोधित ॥ ३८२ ॥
आपुले सबाधी संपत्ति । शिष्यीं प्रगटे ब्रह्मस्फूर्ति ॥
बंधमोक्षाची पुरऊनि भ्रांति । जीवन्मुक्ति दशा पावे ॥ ८३ ॥

( ८ ) गुरुपरंपरा—

आनंदवन वाराणसी । मानससरोवरनिवासी ॥
ब्रह्म पोतलें साकारवेषीं । स्वानंदराशी सदा शांत ॥ ६ १७/६८ ॥
संप्रदाये आश्रम सूत्रीं । गुरुसंप्रदाये विस्तारी ॥
आदि ब्रह्मांडजगदोधारी । उपदेश करी वसिष्ठ ॥ ३६९ ॥
तेथोन शक्ति पाराशर । नारद व्यास विश्रांतिकार ॥
पूर्ण ब्रह्म शुक योगींद्र । पुढें विस्तार तो ऐसा ॥ ३७० ॥
२०] गौडपाद श्री गोविंद । शंकराचार्य विज्ञानबोध ॥
स्वरूपाचार्य प्रबुध । तेथून प्रसिध व्यासाश्रम ॥ ३७१ ॥
पुरुषोत्तम अद्वयानंद । उपेंद्राश्रम पूर्ण बोध ॥
जगन्नाथ सुखस्वानंद । शुध बुध उत्तमाश्रम ॥ ३७२ ॥
मुकुंदाश्रम राघवेंद्र । वासुदेव पुरुषोत्तम सांद्र ॥
जगन्नाथ योगेश्वर । विज्ञानभद्र केशवाश्रम ॥ ३७३ ॥
वामनाश्रम विश्वनाथ । गोविंद पद्मनाभि समर्थ ॥
हरिहराश्रम करुणावंत । जगद्विख्यात पुरुषोत्तम ॥ ३७४ ॥
महादेव परमोदार । जनार्दन जगदोधार ॥
रामकृष्ण दिगंबर । अगम्य चरित्र जयाचें ॥ ३७५ ॥
३०] परिव्राट अद्वैताश्रम । चिदानंद मंगलधाम ॥
चहुं आश्रमा विश्राम । शांताश्रम दिव्य मूर्ति ॥ ३७६ ॥

ब्म्हानंद वसिष्ठ वर्य । पूर्ण ब्रम्ह दत्तात्रय ॥
जनार्दन अपर सूर्य । परमोदार येकनाथ ॥ ३७७ ॥
श्री रघुनाथ चिदानंद । शात मूर्ती स्वानदकद ॥
प्रगट केला ब्रम्हबोध । स्वाराज्यपद पै देता ॥३७८ ॥
शातानद परमोदार । उपदेशून तारक मंत्र ॥
श्रीराम द्वय अक्षर सार । साक्षात्कार ब्रम्हपदी ॥ ३७९ ॥

(९) प्राकृत कवींचा निर्देशः-

प्राकृत कवि येकनाथ । ज्ञानदेवादि सत महंत ॥
अनन्य भावें अभिवंदित । ईप्सितार्थ पुरवावा ॥१$\frac{१}{१८}$ ॥

(१०) ग्रंथाचा प्रसादः— [१०

ॐ नमों सद्गुरु श्रीरामचद्र राजा । शातानद विश्वतो बीजा ॥
भक्त तारिसी आपुले पैजा । न्यून्य त्या काजा पूर्ण करिसी ॥ ६$\frac{१७}{१}$ ॥
आपुली साडूनि सत्य प्रतिज्ञा । राखिलें भीष्माचिया पणा ॥
हारी आणूनि आपणा । भक्तमहिमाना वाढविसी ॥ २ ॥
गजेंद्राचें सोडवणें । गरुड साडूनि धावणें ।।
महा सकटी रक्षून । निज पद पावन पै केलें ॥ ३ ॥
असरें प्रल्हाद गाजिता । खाबी अवतरोनि भगवता ॥
विदारुनि दैत्यनाथा । आपुले भक्तासी राखिले ॥ ४ ॥
अंबऋषीचे गर्भवास । स्वयें सोशिले सावकास ॥
सकट माडल्या भक्तास । देवा आपणास वोडविसी ॥ ५ ॥ [२०
द्रुपदि गांजिता सभेसी । लाज लाविली दुर्योधनासी ॥
स्वयें रक्षिलें पाचाळीसी । जगी कीर्तीसी विस्तारिलें ॥ ६ ॥
नाना आपदीं पाडवा । केला तयांचा सावाधावा ।
भजन प्रेमाचा गौरवा । दयार्णवा प्रगट केलें ॥ ७ ॥
अनन भक्तांचिया रासी । सकटी पावला हृषीकेशी ॥
त्याचिया लिहिता विस्तारासी । परि तो गणितासी कदा नये ॥ ८ ॥
मदें मातला अह रावण । चोरिलें जानकी चिद्रत्न ॥
बदि धातले सुरगण । विश्व दुर्बुद्धीनें पीडिलें ॥ ९ ॥

त्याचिये सोडवणें दयाळा । मेळऊनि वानरपाळा ॥
सेतु बांघला अवलीळा । आले सुवेळा रामचंद्र ॥ १० ॥
सकुळ दशमुख विदारून । स्वपदीं स्थापिले विबुध जन ॥
सोडऊन जनकनंदन । राज्यीं बिभीषण स्थापिला ॥ ११ ॥
ऐसा चिद्‌रघोचा यविवार । लिहितां वाढेल ग्रंथ फार ॥
यालागीं असो विस्तार । अपार चरित्र देवाचें ॥ १२ ॥
परि हा नवलाव अद्भुत । मज मूर्खाचेन मुखें वासिष्ठ ग्रंथ ॥
देशभाषा टीका मारुत । केली विस्तारित जनहिताथा ॥ १३ ॥
देखोनि प्रतापाचें चोज । आश्चर्य वाटे माझें चि मज ॥
१०] माप कृपाळु रघुराज । निजात्म गुज प्रगट केलें ॥ १४ ॥
अथवा तूं चि विश्वंभरा । तेथें मीपणासी कैंचा थारा ॥
कोणें मुखाचें परिहारा । सद्गुरुवरा दयदेवा ॥ १५ ॥

(११) रामावतारार्चे कारणः—

आक्रमर्द क्रूर दारुण । तेणें मातला रावण ॥
जेणें करूनि शंकरभजन । वरद संपूर्ण लाधला ॥ १६॥
शंकरवरदाचें महिमान । जेणें जिंतिलें त्रिभुवन ॥
त्रिगुणापासून नाहीं मरण । ऐसें विंदान जयाचें ॥ २१७ ॥
करशराम तये समईं । होता भूमंडळाचे ठाईं ॥
आपुल्या हस्तें मरण नाहीं । पारंगि तो हि स्वस्थ राहे ॥ २१८ ॥
१०] ब्रह्मा इंद्र यम वरुण । चंद्रसूर्यादि देवगण ॥
रावणघरीं सेवा करणें । भय दारुण मानिती ॥ २१९ ॥
देवां मानवां स्वर्गावती । नव ग्रह सदा पीडिती ॥
ते हि रावणाचे पायीं दडती । घरकर्मी सपदा ॥ २२० ॥
अग्नि आणि पवन । सर्वां रावणाच दण्ड बंधन ॥
कोणाची न चले आंगवण । आर्केद्रि कंदन करिता ॥ २२१ ॥
असो बोलणें बहूत येथें । त्रिभुवनींची जे दैवतें ॥
ते त्या रावणाचि हस्त । दुःख भोगिती उग्र युग ॥ २२२ ॥
दश मृगती विधातियासी । तूं सर्वांचा नियामक होसी ॥
रावणघरीं आम्हांसी । गति कायसी सांग पां ॥ २२३ ॥

ती मिळविली पाहिजे. काश्मीरस्थ पंडितांची संस्कृत टीका प्रसिद्ध असल्याचें ठाऊक नाहीं. ती प्रसिद्ध नसल्यास तिचा शोध केला पाहिजे. तसेंच हें वाल्मीकनगर कोणतें तें मला कळून नाहीं येऊळ कीं काय! येऊळ म्हणावें तर त प्रत्यक्ष गोदातटीं नाहीं. हें वाल्मीकनगर कोणतें त्याची माहिती होणें अत्यन्त अगत्याचें आहे. मोगलाईंत ठिकठिकाणीं जो ग्रन्थसंग्रह मिळाला त्यांत पुष्कळसे ग्रन्थ या वाल्मीकनगरांत लिहिलेले आहेत.

कार्तिक व. ११ }
१८३५ }

शंकर श्रीकृष्ण देव

---

## ४४ ब्रह्मीभूत देवराव हिंगणे

---

१०] १ पेशवाईंतील प्रसिद्ध साडे तीन शहाण्यांची नांवें पक्कीं ध्यानांत यावीं म्हणून एका चतुर पंडितानें 'सखा देवा विठ्ठल' असें सूत्र रचिल्याचें इतिहासज्ञांस विदित आहे. व वरील त्रिवर्गांपैकीं मधील 'देवा' ऊर्फ देवराव हिंगणे ह्यांचें महत्त्व त्यांच्या इतिहासांत अपूर्व आहे. मणपली येथील नानांच्या दफ्तरांतील पत्रें रा. व. द. ब. पारसनीस यांनीं इतिहास-संग्रहांतून प्रसिद्ध केलीं आहेत; त्यावरून देवराव यांच्या दिल्ली येथील राजकारणावर पुष्कळच उजेड पडतो. हिंगण्यांचा व होळकरांचे दिवाण चंद्रचूड यांचा विशेष घरोबा होता व या उभयतां मुत्सद्द्यांनीं रचिलेल्या डावपेचांचें यथातथ्य वर्णन चंद्रचूडांच्या अप्रकाशित व इतिहासदृष्ट्या अत्यन्त महत्त्वाच्या संग्रहांत उत्कृष्टतेनें प्रतिबिंबित झालें आहे. माझी अपेक्षा आहे कीं, हा बहुमोल संग्रह प्रकाशित करण्याचें श्रेय आपल्या मंडळानें शक्य तितक्या लवकर
२०] घ्यावें. इतिहासजिज्ञासूंस पक्का लावून सोडणार, असा किंमतीचा हा संग्रह ईश कृपेनें उपलब्ध झाला आहे. असो.

२ देवराव हिंगणे व श्रीमंत पेशवे सरकार यांजमध्यें कांहीं कारणामुळें तेढ उत्पन्न होऊन, देवराव हिंगणे आपले स्नेही चंद्रचूड यांचेकडे निवासार्थ येऊन राहिले व तेथेंच संन्यस्त होऊन समाधिस्थ झाले. 'ब्रह्मीभूत देवराव महाराज यांचे समाधीचें पूजा नैवेद्य' याकरितां निवळीव येथील पदरचे रामभट व भट दिगंबर उपनाम गुरव यांस शके १७३३ चैत्र शु. १ स दिल्याचा सनदपत्र. देवराव हिंगणे हे निवळीस व समाधिस्थ झाले, असें निर्विवाद ठरतें. त्यांना हा समाधि...

गांव येथें गणोबा तात्या चंद्रचूड यांनी बांधिलेल्या श्रीगणपतीचे देवालयासमोर च आहे. मूर्ति दशभुजानी युक्त असून ध्यान फारच मोहक आहे देवराव हिंगण्यांचे जे कागद मुद्रणयंत्रातून बाहेर पडले त्यात त्यांच्या मृत्यूच्या प्रकारासंबंधानें काही हकीकत दिली गेली नाही. रा. ब. पारसनीस यांनी सुमार इ. स. १७८३ हा त्यांच्या मृत्यूचा काल धरलेला आहे, परंतु माझे मित्र श्रीमंत मुजुमदार यानी मला कृपाळुपणे दिलेल्या कागदावरून हा काल साफ चुकीचा ठरतो. देवराव हिंगण्यांचे वंशज चादोरी येथे नांदत आहेत, त्यांचे संग्रही कांहीं महत्वाची ऐतिहासिक सामुग्री आहे. असो, हा कागद म्हटला म्हणजे निंबगाव येथील कुळकर्ण्यांचे दफ्तरांत श्री० चंद्रचूड यांच्या निंबगाव येथील जोसपणाच्या वृत्तीसंबधाने शके १७२९ आषाढ महिन्याचे हिशेबासंबंधीचे मिळालेले एक विश्वसनीय टाचण होय. ह्या टाचणात देवराव [१० महादेव हे संन्यास घेऊन समाधिस्थ झाल्याबद्दलचा स्पष्ट उल्लेख असून, शिवाय अकराव्या, बाराव्या व तेराव्या दिवशीच्या श्राद्धानिमित्त दक्षिणा व इतर सामान जमेकडे लिहिलेले आहे त्या अर्थी देवरावांच्या पुण्यतिथीपासून अकरावा बारावा व तेरावा हे तीन दिवस अनुक्रमें शके १७२९ आषाढ शु० २।३।४ ह्या तिथींस पडत असल्याचें ह्या कागदांत दिले आहे, त्या अर्थी शके १७२९ ज्येष्ठ वद्य सप्तमी, शनिवार, ता. २७ जून इ. स १८०७ ही देवराव महादेवाची समाधितिथी निःसंशय ठरते.

## सनद*

**लेखांक १** श्रीरामचंद्र

वेदमूर्ती राजश्री धोंडभट बिन विठ्ठलभट उपनाम खुदामे गोत्र वासिष्ठ सूत्र [२० आश्वलायन शाखा शाकल वास्तव्य मौजे निंबगाव तरफ खेड प्रांत जुंनर स्वामींचे शेवेशी

(मोर्तब) सेवक गोविंदराव पुर्षोत्तम व दामोदर देवराव हिंगणे साष्टांग नमस्कार विनंती उपरी सुरु सन अशर मया तेन व अलफ शके १७३२ प्रमोदी नाम संवत्सरे तुम्ही पुण्याचे मुकामी येऊन विनंती केली की आम्ही कुटुंब वत्सळ ब्राम्हण

---

* सदरहू सनद व नेमणुकीची यादी असे दोन्ही कागद खुदामे यांचे विद्यमान वंशज वे. शा. स. त्र्यंबकभट खुदामे, निंबगाव यांजकडून मिळाले.

आमचे योगक्षेमाची सोई नाहीं याजकरीतां कृपा करून कुटुंबाचे स्वास्थ्यानिमित्य योजना करून देविला पाहिजे आम्ही स्नानसंध्या करून धर्मीमूत देवराव महादेव सन्यस्त होऊन मौजे मारी समाधिस्त जाले त्यांचे समाधीची पूजा नैवद्य करून आपले आभिष्टचिंतन करू त्याजवरून आम्ही मनास आणितां तीर्थरूप धर्मीमूत त्यांचे समाधीचे पूजा व नैवेद्य चालविला पाहिजे ऐसे तीर्थरूप मातुश्री राजश्री याणी आज्ञा केली कीं भग्नी थोर सतपात्र विद्वान स्नानसंध्या करून समाधीची पूजा नैवद्य करतील वास्तव आम्हास इनाम देऊ मौजे चांदोरी पो मासिक हा गाव पातशाह आलमगाह्य श्रमिलाचे सरकारातून पेशजीपासून आम्हांकडे चालत आहे येथील निवारसी गाव चालीची गतकुळी जिराईत अवल दुर्यम तिर्यम तीन मतीचा १०] रुपये १५० दीडशे याचे बिघे सुमार ६० आकरी साठ याची चतुसीमा पूर्वक जल तरु तृण काष्ठ पाषाण निधि निक्षेप आदीकरून सेरीज हाकदार तुम्हास इनाम करून दिल्ही असे तरी तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वशपरंपरेनें त्या जमिनीचा अनुभव घेऊन श्रीस्वामीचे समाधीची पूजा नैवेद्याचे नेमणुकीचा यादी आलाहिदा करून दिल्ही असे तरी आमचे आभिष्ट चिंतन करून सुखरूप आनुभव घेत जाणें आपले वंशीचा तुम्हास आक्षेप करणार नाही आक्षेप केल्यास श्रीमहालक्ष्मी व ५।स्वामीचे चरणाची शपत असे रा छ ७ रविलावल बहुत काय लिहिणें

## लेखांक २

श्री

नकल

यादी नेमणूक श्रीब्रम्हीभूत देवराव माहादेव हिंगणे मौजे निंबगांव ता। खेड प्रांत जुनर भीमातीर येथें सन्यस्त होऊन समाधिस्त जाले त्याचे समाधीची पुजा नैवेद्य जाला पाहिजे यास्तव मौजे चादोरी पो नासीक हा गाव इनाम आह्माकडे पेसजी-पासून चालत आहे त्या पो रुा १५० दीडशे याची जमीन आलाहिदा सनद वो धोंडभट बिन विठलभट खुदामे मौजे मा।र यास पूजा सागून नेमणूक करार करून दिल्ही बिा

७५ वेतन सालीना [१०

३६ भोजनखर्च

१७ पूजासाहित्य

१ चदन खोड

०॥० बुका

०। कापूस वातीस

१ खारका वजन ००४

१।० सुपारी

०॥० कापूर

०।॥० उदबत्त्या

०॥० वस्त्र खादीचें [२०

४ तेल दिव्यास

१ साकर

६ गुरुवार दरमाहा ०॥ प्रो

१७

२२ पुण्यतीथ समंधी

१५०

सदरहू येकूण रुो दीडशें येणेप्रो करार

सुर सन आशर मया तैन व अलफ शके १७१२ प्रमोद नाम संवत्सरे माहे रवि
लावल शके चैत्र मास शुा १ मुकाम पुणे

निंबगांव, मिती आश्विन शु॥ ११।३५ शनिवार } पां म पटवर्धन

## ४५ आनंदीबाई पेशवीण हिचा पुराणिक

रत्नागिरी जिल्ह्यांत राजापुराजवळ विजयदुर्गाच्या रस्त्यावर अगसुरें नांवाचें एक गांव आहे तेथें गिरीश्वर नामक देव व त्याचें देवालय डोंगरावर आहे त्याचे पुजारी व पुराणिक गाडगीळ नांवाचे ब्राह्मण आहेत या गाडगिळांचा एक पूर्वज मस्त्यात आनंदीबाई पेशवीण—राघोबादादाची बायको—हिचा पुराणिक होता १०] तत्संबंधीं एक पत्र पुढें देत आहे या गाडगिळांच्या घरांत बरेच पुरुष चांगले श्रौतादिशास्त्रज्ञ झाले पेशव्यांच्या आश्रयानें त्यांनीं थोडीफार संपत्ति हि अणसुऱ्यास कमाविली व तेथील गिरीश्वराच्या देवळाचा व इतर देवळांचा जीर्णोद्धार केला त्यांच्याकडे यथोद्देशाचें गरीब ब्राह्मण साहाय्याच्या इच्छेनें येत पैकीं एका द्रविड ब्राह्मणाचें एक विनतिपत्र पुढें देत आहे या घराण्याकडे विपन्न लोक व ब्राह्मण गहाणवाणाकरितां हि वारंवार येत पैकीं धनीक गहाण ठेवण्याकरितां एका ब्राह्मणानें पाठविलेलें पत्र हि पुढें देत आहे पुराणिकाचें नांव वासुदेवभट गाडगीळ अस्सलपत्रें सोबत जोडिलीं आहेत हीं पत्रें अणसुऱ्यास पुराणिक गाडगिळांच्या येथें मिळालीं

२०] लेखांक १

श्री

तीर्थस्वरूप अनंतभट दादा वडिलांचे सेवेसी

अपत्यवद्वासुदेवाचे शिरसाष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम ता॥ मार्ग शुध प्रति पदा मोकाम येउर वडिलांचे आशीर्वादें सुखरूप असें विशेष वाडुन वडिलांची आज्ञा घेऊन निघालो तो श्रीमंताजवळ यथापूर्व सुखरूप पावला येतां व ता॥ भिमदामदी

बाईकडे पुराण भागवत सांगो लागलों वडिलांचे आशीर्वादे येथापूर्वक पाउन+ + +
वडिलाचे चरणाचा प्रताप + + + + + + -|- + + + + + + + + +
+ + + + + + + + प्रयोजने आहेन तों सर्व सपादून यावी—पैक्याची चिंता
न करावी वडिलाचे च आशीर्वादे पैका पुष्कल मिळेल स्वशरीरि बहुत निघा करून
सुरक्षीत असावें चिरंजीव कृष्ण बाईम मुले घेऊन आला ह्मणोन ऐकिले उत्तम आहे
दाणादुणा–भात–गवत घेऊन ठेवावे कागदपत्र पाठवावा विशेष वर्तमान श्रीमंता-
कडील कृष्णभट्ट देवधर निवेदन करितील पुण्यास या मुकामाहून आल्यावर
धडवती लुगडी पाठवितों खर्चास हि शीघ्र च पाठवितो हे विज्ञापना

## लेखांक २

श्री [१०

॥ विहगपुगवपुंगववाहन
मकरकुडलिकुंडालिकुडलि
वपुरुमाधवमाध (व) यो श्रिय
दिशतु चद्रकिचद्रकिशोराकि

॥ श्रीमत्सकलगुणमाणिक्यमंडलमडिताना ॥ निखिलसुरासुरनिककन्यस्तमुकुटतट-
रत्नप्रभापाथोनिधेरब्जानिभनखरजितशिजन्नूपुरकिंकिणींकणग्रैवेयकाद्याभरणभूषित –
नवाजापरिवृढ – काकोदर–ग्रैवेइकाब्ज – चूडामाणि – महादेवपादपद्मभ्रमरीकृतानां ॥
बधुजनसज्जन – विद्वज्जन – चकोरचक्रमधुपचद्रमित्रसहस्रपत्राणा ॥ आव्हानना
न्माप्रसित्धाना प्रभूणा ॥ चित्रोपलदुर्गवाशिना वेंकटाचार्येणकृता नतयः ॥ युष्मदीय-
कृपाचद्रचद्रिकालोलुप द्विज दृष्ट्वामामे यथासौख्य तथा कुरु महामते ॥ युष्मदभ्युद [२०
याकाक्षीमास मासार्धमेव वा ॥ धर्मकालभया सोह वसामि तव सन्निधौ ॥ महायात्रा-
निमित्तेन युष्मदीय पुर प्रति आगतोह गुणाश्रुत्वा वसामि तव पटणे ॥ नैवार्थकामुकः
सोह प्रत्यह तव दर्शनं ॥ तदेव शुभद मन्ये पर यद्भाविनो भवेत् ॥

## लेखां ३

( काही ओळी गहाळ )

साष्टाग नमस्कार विनति विशेष + + वडापर्यत जावयाची तर + + + रून
निघोन जावे दाहाचाळीस आणावे सवत्सराची बेगमी करावी आणि बधुदर्शनार्थ

जावें हा हेतु धरूनि ( श्री ) योग जावे हा उद्योग योजिला तो प्रारब्धानुरूप याव मोठला मास दोन मास याव वरा होत नाहीं महाशयास पाहिजे यद्यपि ति एका माहीं धान्य पांच कुडव आहे हें सरल्यावर उपाय नाहीं या करितां याइकोल पाठ विली आहे रुपये १०० एक शत दिल्हे पाहिजेत श्रावणसी व्याजसुधा रुपये देईन नाहीं पावले तरी मनी यगीक नगनगोंसुधा तुम्हास देईन विश्वास न ये तरि यदीक व सांठि पाउणशें रुपयाचें नगनगोंचें सुधा आणि घेऊन जावी श्रावण माहीं रुपये देईन आणि यगीक नेईन अथवा तुम्हास पाहिजे तरि रुपये घेईन आणि यदीक देईन परंतु आणि माझे कार्य केल्यास मज सुधा कुटुंब खरीद करुन पालण पोषण केलें येवढें श्रेय आपणास येईल याकरितां कृपा करून कार्य केलें पाहिजे रुपये तुम्हापशी १०]नसतील तरि दुसरियाचे घेऊन द्यावे आणि माझें कार्य संपादून यशविभाग घेतला पाहिजे अगतिक गति जाणोन लिहिलें आहे व्याज दर माह द ( २ सेकडा तुम्ही म्हणा ) रु त्या प्रमाणें ( देईन )

वि का राजवाडे

~~~~~~~~

## ४६ 'श्रीशक' १०३ मधील मराठी ताम्रपट

रा विनायकराव भावे यांनीं मजकडे भिमथडी तालुक्यांतील सोमर्थांचें करजे येथील रा बापूराव यशवंतराव मोकाशी गांडवळकर, यांजकडे मिळालेलें एक दानपत्र लिहून पाठविलें तें आज आपणापुढें सादर करीत आहे.

हे एकंदर तीन पत्रे असून, मधला पत्रा दोहों बाजूंनीं लिहिलेला आहे पत्रे प्रत्यक्ष त्यांची लांबी, रुंदी, जाडी, अभरांचें वळण वगैरे संबंधी मला कांहीं एक लिहितां येत नाहीं, परंतु ज्या ठिकाणीं या नियमी पत्रांतून कशी खोदलेली दिसते त्यावरून हे पत्रे आठवे लिहिले असावेत असें अनुमान २०] निघतें पहिल्या पत्र्याचे आंतील बाजूवर, दुसऱ्याचे पाहिल्या बाजूवर, ११।११ ओळी असून, दुसऱ्याचे बाहेरील बाजूवर १२ आणि तिसऱ्याचे आंतील बाजूवर १४ अशा एकंदर पावन्न ओळी आहेत

एक १, दोनी २, तीनी ३, चारी ४, असे शब्द व आंकडे प्रत्येक लिहिलेल्या त्या त्या बाजूवर कोरलेले आहेत ते उजवे बाजूवर आहेत यांनीं लिहिलेल्या बाजूवर वरचे अंगास प्रथम ओळीचा आरंभ होण्याचे पूर्वी कांहीशा डावेबाजूकडे तलवारी व मध्यमागीं अर्धचंद्राकार बाण यांच्या आकृती कोरल्या आहेत

१ त्या पत्र्याच्या वरच्या अंगास प्रथम दोनरेषेचा 'अर्धचंद्र' काढून त्याच आंत चंद्रमा, अशीं अक्षरें आहेत व त्याचे खालीं
~~~~~~~~

पत्र लीपींत काळभट् कामना
क थऩ लोणी सीगाले रेनु
१००००० सोनटके

हा लेख आहे. तिनन्या पन्चात्र वाहेरील अगारर पूर्ण शून्याकार द्विस परिवाचा 'सूर्य' कोरून आत 'मुरीयो' 'ही' अक्षरे असून त्या खाली

उ/ळी वावन ५२

असें लिहिलें आहे

कडीवर मुद्रा नाही. व कडीची तोंडें सांधलेली नाहीत.

या शासनांत श्री शक १०३ असें म्हटले आहे. हा शातवाहन शक नाही हें तर उघड आहे तेव्हा हा शक कोणता असावा असा प्रश्न सहज च उत्पन्न होतो. [१० अतर्गत पुराव्यावरून याचा निश्चय करतां येण्यासारखा आहे. त्याचा थोडासा प्रयत्न करतों.

यात जी मऱ्हाटकुळीची नावें आली आहेत ती अशीः—

| | | | |
|---|---|---|---|
| १ शीरसठ | २ जाधव | ३ चौव्हाण | ४ यादव, |
| ५ सूर्यवंशी | ६ रीठाडु | ७ पवार | ८ माना |
| ९ पोळ | १० सुलोकी | | |

यापैकी शीरसठ हे शिरके, रीठाडु हे राठोड व सुलोकी हे साळुंके असावेत. शीरसठ यास शिरके म्हणण्याचें कारण मी पुढे देत आहे

जाधव व यादव हे एक म्हणुन आज पावेतो समजूत होती, परतु या शासनपत्रावरून या दोन भिन्न कुळी दिसतात. [२०

आता पवार किंवा परमार, राठोड ही नांवे जरी पुरातन काली हि आपणास आढळतात तरी ' जाधव ' हे नाव ११ वे शतकाचे पूर्वी मला कोठे उपलब्ध झालेले नाही तें ज्या अर्थी या शासनपत्रात दिसते त्या अर्थी हें ११ वे शतकातील अगर त्या नतरचे असले पाहिजे

याहून आणखी एक अन्य प्रमाण आहे तें

यांत राजांची जी नावें दिली आहेत व त्याची जी नाती आहेत ती अशी:—

२५

१०]

यांतील ' जैतपाळ ' ' भिल्लम ' हीं नांवें आपल्या ओळखीचीं आहेत. देवगिरीचे सीरीं । अंधा नाम नगरीं ॥ या आंध्राचा 'जैतपाळ' घेतला काय किंवा जोगाईच्या अंब्यावर हुकमत चालविणारा ' जैतपाळ ' घेतला काय त्यांत याचें नांव आलें २०] आहे हें शासन पण १२ वे शतकानंतरचें च असलें पाहिजे जैतपाळा नंतरचा ४था पुरुष 'बळियेपा' याचा उल्लेख यांत असल्यामुळें १३ व शतकानंतरचें हें शासन असावें

तथापि 'बळियेपा' या नांव जो उल्लेख आलेला आहे तो भूतकालच्या मानाना सबंधी जसा करावा तसा तो केलेला आहे इतकेंच नाहीं तर पुढें स्पष्ट केल्याप्रमाणें

हा वळियापा 'वराच' या वेळी पुरातन झाला होता असें उघड दिसतें. तेव्हा वळियापा नंतर हि शतक दोन शतकानी हें शासन लिहिलें असावे, असें वाटतें

पण याहून हि एक अत्यन्त महत्वाचा पुरावा आहे तो असाः—

जाहाली, तिन्हें, तेण्हें, तिनें, तेणे, सागीजे, 'व' अर्थी वा. ही रूपें श्रीज्ञानेश्वरोत्तरीन कालचीं आहेत. परतु

पुजारा, गोरउ, पापाळणे

हीं रूपें १६ वे शतकातील खास नाहीत. याहून आणखी महत्वाचे शब्द यांत आलेले आहेत ते

'मुसारा' 'नफरा'

हे होत हे अर्थात 'मराठी' नाहीत ते फारशी आहेत व ते या शासना [२० येण्यास त्याचा काल शक १२१२ चे नंतरचा असला पाहिजे हें उघड आहे.

तेव्हा १६ वे शतकापूर्वी व १३ वे शतकानतर केव्हा तरी या शासनाचा काल असला पाहिजे हें उघड आहे. तो आपण ठरविण्याचा प्रयत्न करू.

दुर्मति सवत्सरः—

१२४३।४४, १३०३।०४, १३६३।६४, १४२३।२४ व १४८३।८४

या शकात येतो या पैकी चैत्रशुद्ध पचमीस ज्या शकी सोमवार असेल तो शक खरा धरला पाहिजे.

शक १२४३।१२४४ मध्यें चैत्रशुा ५ ला—रविवार येतो

शक १३०३।०४ मध्यें ,, —मगळवार ,,

शक १३६३।६४ मध्ये ,, —बुधवार ,, [३०

शक १४२३।२४ मध्यें ,, —शुक्रवार ,,

आणि

शक १४८३।८४ मध्ये ,, —सोमवार येतो.

या दृष्टीनें या शासनांत दिलेला शक शातवाहन शकाच्या दृष्टीने १४८३।८४ हा येतो, तेव्हा 'श्रीशक' १०३ या शातवाहन शकांत येण्यास तो शक १३८०।८१ मध्यें सुरू झाला असला पाहिजे हें उघड आहे तेव्हां १३८० शकांत कोणाचा शक सुरू झाला हें कळलें पाहिजे.

याच्या स्वरूपावरून हें शासनपत्र नसून बहुधा हकीकतपत्र आहे असें दिसतें. हा ११८० मध्यें सुरू झालेला 'शीशक' एक तर शिलाहारांचा असावा अथवा शक १३७७ यांत शक म्हणतो त्या प्रमाणें मलिक-उल्-तुजार याच्या ७ हजार सैन्याची जी शिरक्यानें कत्तल केली त्यानंतर निर्माण झालेल्या शिरकशाचा असावा. प्रस्तुतच्या हकीकत – नाम्यांत 'मिलम (कुन्हा) 'महामिलम अथवा त्यांच्या कुळांतील 'वळीयेप्पा' या तीन नांवा शेरीज अथवा 'वळीयेप्पाचा 'पीला' राघागो या शेरीज इतर नांवापुढें 'दरणा' हें उपपद लाविलें आहे. यांत जीं नावें आलीं आहेत तीं सब वळियेप्पाच्या धोरणानें दिलीं आहेत. त्यांचा स्वतंत्र असा उल्लेख नाहीं. वळीयेप्पाचा' अथवा

१०] त्याच्याचा अमुक असा सोपस्कर उल्लेख असल्यानें मुख्य 'वळीयेप्पा व त्याचे अनुयायानें इतर अशी मावना सहज होते व म्हणून 'दरणा' हें उपपद कमी दर्जा दर्शविणारें आहे असें वाटतें.

या वरून शिरके अथवा शिलाहार (शेलार) यांच्या शक ११८० मध्यें सुरू झालेल्या शीशकाच्या १०३।१०४ थे वर्षी चैत्राच्या शुक्ल ५ स हें पत्र कोरलें गेलें आहे.

यांतील भाषा सोपी असल्यानें तिच्या गाभ्याचें स्वतंत्रपणें उद्धरण करीत नाहीं. टीपा दिल्या च आहेत.

जीं गांव गावें इनाम दिलीं आहेत तीं अशीं:

| | | |
|---|---|---|
| गुरवास सहा<br>२०] व<br>इतर मिळून सहा | } | सकुर्रें शमुपुर, अपराळे धवडे, पिंगळजा मार्तावग, कारपडें, मुसासन धाडार्थे, कोधळें पाभुरणी व पिंपरी |

हा गावें 'पारंपार' परंपरेनें उपभोगावीं

चंद्रमा

# पत्र लीषीत काळभट्ट कामना क थळ लोणी सीवाले वेचु १००००० सोनटके

 यक १

१ श्री सकु १०३ वरुष: दुर्मती नाम छंवछरे: चैत्र मासे: सुक्ल पक्षे: मो
२ महीने: पचमी तें दीनी: पुर्व पत्र लीहीले: मभुवनदेॐ ते थांनी बे
३ सलें: सीरमर्दु बलीयेपु: बीन गोपती: वां जाधव वंसी कुन्हा भील
४ सु: बीन साहा भीलमु: वां चौव्हाण रामाजी: बीन दसमदरणा
५ वां याधव वंमी लषमाजी: बीन गोपाळदरणा: वां सुर वंभीं सुरा
६ जी:बीन घाटदरणा: वां रीठोडु गमलु: बीन जेतपाळदरणा: वां
७ पवार धारमलु: बीन हवीरदरणा: वां मानों गोपाजी: बीन रा
८ जदरणा: वां पोळु पद्माजी: बीन हरीपाळदरणी : वां पुजारी बी
९ जभरडा. बीन सपर भरडा मे समस्त गण भगत बैसले: स
१० भुवनदेॐ साक्षे करातु प्रवं आदी पाहिलि: मोटी येगे जाहाली
११ ह्या प्रवतीस कीर्तीयेगी कात प्रवंतु. त्रीतीं योगी इंद्रकीळ प्रवंतु: द्वापा
१२ री लींगमे प्रवंतु: वंळीया अनी कोथळे प्रवंतु: पर सीवीले नन्ह

---

१ दुर्मति २ सवत्सरे. ३ ते. ४ पुर्वपत्र (हकीकतनामा) ५ शभु वनदेव ६ स्थानी. ७ प्रतिष्ठा केली. ८ प्रत्येक नावाची कुळी प्रथम दिली आहे ९ व १० वशी ११ देशमुख १२ यादव १३ सूर्यवशी. १४ राठोड १५ माने १६ पोळ
१७ पुजारी. १८ येथे व पुढे प्रत्येक भोकाचे ठिकाणी अक्षरे गेली आहेत. 'ऐसे' १९ पर्व (त). २० साठ २१ युगे २२ कृतयुगी. २३ त्रेत. २४ संस्कृत 'कल्याम्' या धर्तीवर सप्तमी. २५ शिवालय

( पत्रा २ पाहिली बाजू )　　　　दोनी २

१ हें छींगच म्होतें॰ उपरी सीयर या पाव टके वा उवरेश्वर वा साकुरें ही
२ सीवाळें बळीयेपें मार्थळीं उपरी बळीयेपाची माताह्मा भीळमाची
३ कन्या गोपाई तीने गोपेस्वरी　　वाले मार्थळें उपरी बळीयेपाची
४ राणी　वृमवृरण्याची कन्या,　　वती ती हे फामेस्वरीचें सीवाळें
५ मार्थळें॰ उपरी बळीयपाचा बीलोराभागा तेण्हें सप्तपुरीचें सीवाळे गाध
६ ळें॰ हे मीरसाटोची अवी॰ उपरी कुन्हा मिळमु॰ बीळीयेपाचा माउळा गा
७ पाईचा वडु तेणें चीचणेस्वरीचें सीवाळे मार्थळें　उपरी भीळमाची माता
८ घाटवृरण्याची कन्या रामाई तीनें रामस्वरीचें सींवाळे मार्थळें　उपरी
१०]९ भीळमाची राणी रींठीया जैतपाळाची कन्या माणकाद तीन्ह मोणमांवी
१　चें सीवाळें मार्थळें॰ हे जाभत्रांची आवी॰ उपरी पन्धाण रामाजी व
११ ळीयेपाचा मेहुणा पद्मावतीचा वडु तेण्हें मेळेस्वरीचें सी
१२ वाळे मार्थळें　उदरी रामाजीची राणी पोळी हरीपाळ दरण्या
१३ ची कन्या कमळाई तीन्हें फण्हेरेस्वरीचे सीवळे मार्थळें॰

( पत्रा २ रा दुसरी बाजू )　　　　तीनी ३

१ उपरी ह्मा सीवाल्यास पुजारा गोरेऊ बीजभरहा तणें पाळवणीचें भी
　वाळे मेंपेळें॰
२ ह्मा सीवाल्याचा फामकरी ॐहें हैंक्ष नापीक पुतौ हचीरनीफु धान
　मह्म ना
३ फु॰ स्या पाळी ॐहें यहु हजार स्पासी धज हुमारो दर गागा पत्रु
　देखोळी

२०] १ म्हणे (मान्य) होतें २ सोम ३ मांधर्ली ४ मातामही मातामह याचें स्त्रीलिंगी मातामहा ५ शिवालय ६ पद्मावती ७ पुत्र ८ मामा येथ आन मामा ९ बंध १० रागोह ! ११ जसें माना, पुजारा, तसें बाद=ोट १२पुजारी १३ गुरव १४मांधर्लें १५ उंग १६ मुख्य १७ नापीक पुना ई गिरि हेरे यावर असेल तर उंगाचा रमाण आहे नांवावरून आल्हुरा नाम अस असें दिसतें, पण त्याचे यापार्थ हि नाव पुर्व दिलें च आह गोमभोपुत्र भाव नाव अनार्यांची पूर्वी हातीं १८ माईक नायक=मुख्य याचे रातामाली एक हजार क॰ होम १९ मुधाहिरा

४ आँ दोघां नफरीं सोनटकीं पार्चसे *ऊडां षळियेपाचे देणेः अडीचसें *ऊ

५ डां भीलमाचे देणेः दोनीसे *ऊडां रामाजीचें देणेः पनासा *ऊडां वीज
६ भरड्याचे देणेः येसी चौदा वरुसीं सीवाले कळसा आँलीः द्रीवस
७ क्ष्या येकु लक्षुः सोनटके देपीर्ले चुना येकसे वतीस सन्नै षंडी कात गुळ
८ तागुं तीनसेसाटी षंडीः लोषठे येकसे तेरा षडीः चीरे पाणी लोण पणु
९ दुरें वा फळठणंः ह्या सीवाल्यास बारा गांउं ईनाम पुंजेसं वीज भरड्यास सकु

१० रे संभुपुरु वा ऊवरडाहो वा धवळे रः वा पीगळजा वा पाळीवण हेसा [१०

११ गाउं वीजंभरडयान पुजेस षाईजे त्रीकाळ पुजा कीजे पारेपा
१२ रुं जाण वजि भगतांपे येशु सागीजे कारवडं ईनाम पारेपारः

( पत्रा ३ ) चारी ४

१ वालांघी सभु वनि हीव जो सीवालें लोटीं जें नाहाणि पार्षाळिजे पुजेस
२ उदक आणीजे देवाची पालषी वाहजि सुकासन ईनानें षाईजे पारेपा
[‡ईनाम षाईजे पा

३ रः वा सो र टे गो ना भा ना पाउ वाची जा कीजे थादाळे‡
४ रंपारे व घर्डसी बेलो वीन वऱ्हा ट उवांचे वा धावेंणे कजि कोथळे ई-

---

* ऊट १ दरमहा चाददर्शनी (शुद्धद्वितीया). अस्सल मुसलमानी. २ [२० हा शब्द फारशीत उंटाच्या टोळीस लावण्याचा प्रघात आहे जसें 'उंट नफर नउ'= उंटांच्या नऊ टोळ्या. ३ सोन्याचें नाणे ४ पूर्ण झाली ५ द्रव्यसख्या. ६ सह, समावेश करून, 'सेरीज,' याच्या उलट ७ सहस्र. ८ खंडी ९ ताग १० माती गोळे ? ११ चिरे, पाणी, लोण, पणदुरे व फळठण १२ पुजेस खाईजे—पूजेस्तव खाईजे १३ परपरेनें १४ भागतापि—भगताना ? १५ ? १६ झाडावें स्वच्छ करावी १७ इनाम. १८ पायवाट कीजे. 'पाउवाची जागा कीजे'. १९ वाजंत्री, गुरवाहून भिन्नजात. २० ?

५ नाम पाइजे पारेपार' दांमठ मारा गोरा भगतो माळा देईजे माण कुचा
६ माहोजे जासुळणी इनाम पाईजे पारेपार' मा लोणारे भारमलु धनि बाबना
७ क सीशाल्यास चुना नर्व सारीजे पीपरी ईनाम पाईजे पारेपार
८ येसे बारा माऊ' पहोली गुडी परडी माळ पुर्व दारवठा सीरसाठ धा
९ सुळोकी दोही मगाचा मानु दुसरी परडी गुडी पर्छीम मुंगुद्वारे याषव
१० माने धा रीठें मानु जाणीजा तीसरी परडी गुडी उत्रदारवठा जाषवी धा
११ पवार मानु जाणीजे' चौथी परडी गुडी दृपीण दारवठा चव्हाण धा गु
१२ रेवसी मानु जाणीजे पाचवी परडी नदीची पोळांचा मानु जाणीजे
१०]१२ येसे मुवपत्र लीहीलें सहुमनदेउ साक्ष करुनु हे जो पाळवील त्येस तीर्थी लो
१४ कीचा चंद्रु ओळेल हो जो न मनी आसेते करी त्याचण प्रवजासी गडषो०
( पत्रा ३ वरची बाजू बाहेरील )

अली पावन ५२

गो का चांदोरकर

# ४७ बाळाजी विश्वनाथ पेशवे याचा उल्लेख करणारीं दोन पत्रें

२०] १ चिपळूण येथील कुलकर्णी वासिष्ठ गोत्री वसिष्ठ या आडनांवाचे आहेत त्यांच्या येथील कसरीनें व वाळवीनें भुगा झालेल्या कागदांच्या गठ्यांत सापडले दोन कागद सांपडले एक सन तिसेन अल्फ सालचा म्हणजे शक १६१८ चा राजाराम छत्रपतींच्या राजवटीतील आहे, व दुसरा दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीतील आहे पहिला महजर आहे त्यांत बाळाजी विश्वनाथाचा दोनदां उल्लेख आलेला आहे एकदां हजर मजालसींतील देशकांच्या म्हणजे देशमुखांच्या यादींत

१ मधा २ वगाचा दजाचा ३ मुकद्दार ४ उत्तर ५ त्यास ६ धर्म ७ असत्य ८ पूर्वजांसी ९ पापाकि

आलेला आहे व दुसरा महजराच्या शेवटी शेवटीं आलेला आहे. पहिला उल्लेख असाः—

राजश्री बाळाजी विश्वनाथ देशमुख मामले दंडाराजपुरी व अधिकारी श्रीवर्धन

ह्यावरून उघड च आहे की शक १६१८ त बाळाजी विश्वनाथ दंडाराजपुरीचा देशमुख होता व श्रीवर्धनचा अधिकारी होता.

दुसरा उल्लेख असाः—

छ १३ माहे शौवली रविवारी नजीक जुमा मसीद कसबेमजकूर येथें (म्हणजे दाभोळ येथें) राजश्री माहादजीपंत सुभेदार व राजश्री बाळाजी विश्वनाथ सभासद इ इ इ [१०

ह्या उल्लेखांत बाळाजी विश्वनाथाची सभासदांत गणना केली आहे

ह्या दोन उल्लेखांवरून एवढे स्पष्ट होतें की शक १६१८ त बाळाजी विश्वनाथ दंडाराजपुरीचा देशमुख श्रीवर्धनचा अधकारी व दाभोळचा सभासद होता. देशमुखाचा हुद्दा सर्व प्रसिद्ध आहे. अधिकारी हा हुद्दा गांवचा आहे गावचा जो मुख्य कामगार तो अधकारी. अधकारी हा शब्द परभु, ब्राह्मण, वगैरेंचें धद्यावरून किंवा वतनावरून आडनाव झालेला आढळतो. सभासद म्हणजे किल्यावरील किंवा सुभ्याच्या ठाण्यावरील कौन्सिलदार. सभासद ही राजमान्य पदवी असे त्याचे काम कोणत्या हि मुलकी लष्करी किंवा निवाड्याच्या कामी किल्लेदाराला किंवा सुभेदाराला सल्ला देण्याचा असे कौन्सिलच्या मदतीनें मराठेशाहीत कारभार पहाण्याची पद्धति असे व ही पद्धति पुरातन कालापासून भारतवर्षांत रूढ असलेली च मराठेशाहीत [२० आलेली आहे

२ बाळाजी विश्वनाथ घाटावर कधी गेला हा प्रश्न आद्याप सुटलेला नाही. शक १६१८ च्या आधी तो घाटावर गेला असावा व कांहीं कामाकरिता शक १६१८ त कोंकणांत आला असावा. त्या च वेळी हा महजर व निवाडा होण्याची गाठ पडली, व ह्या महजरांत त्याच्या नावाचा उल्लेख झाला.

३ दुसऱ्या कागदात बाळाजी विश्वनाथाचा येणेप्रमाणे उल्लेख केलेला आहेः—

बाळाजीपंत नाना देशमुख शामळाचे दंग्यामुळे वरघाटी (म्हणजे चिपळूणास) आले ते समयीं आम्हीं (म्हणजे चिपळूण येथील गाव कऱ्यांनी) (त्यास) जागा नेमून दिल्हीं

२६

यावरून एवढें सर्व दिसतें कीं शामब्यांच्या दंग्यामुळें म्हणा आसामुळें दंडाराजपुरी व श्रीवर्धन सोडून बाळाजी विश्वनाथ चिपळूणास येऊन घर करून व बांधून राहिला चिपळूणास बाळाजी कधीं आला तें नक्की ठरविण्यास सध्या मजजवळ साधन नाहीं

## लेखांक १

माहाजर व तारीख छ ५ माहे जिलकाद अज मोकाम कसबे चिपुलण मामले इमजाबाद अमल मद्दर मैमुन मुस्तफाबाद सुहुर सन सबा तिसैन अलफ बिहुजूर हाजीर मजालसी

| | | |
|---|---|---|
| वेदमूर्ति कसबे मजकूर | | राजश्री गणेश माहा |
| अवधूतभट | सिवराम भ | देव हवालदार ता मजकूर |
| १०] धर्माधिकरणी | ट धर्माधिकरणी | |
| हर जोसी गो | अनंत भ | |
| विंद जोसी | ट मंत्रभट | |
| विश्वनाथभट | | रामाजी पंताजी मजम |
| पटवर्धन | | दार ता मजकूर |
| राजश्री बाळाजी विश्वनाथ | | देसक मामले मजकूर |
| देशमुख मामले दंडाराजपुरी | | रंगोबा नाइक सरदेसाइ / संभो अवा जी जानाध |
| व अधिकारी श्रीवधन | | संभो चलाल दसमुम |
| राजश्री उभाजी भागवत | | |
| सताजी भागवत | | माशे रघुनाथ |
| २०] देवजा भागवत | | मोकादम व्रिा |
| जोत्याजी पवाण | | सावरकर |
| जैतोजी रणनवरे | | देसक कयाती चिपुलण |
| रायोजी वागवरे | | महमदजी द सांई / भायणसेट स ग्यिा |
| पाटील मौजे आलगाव | | नुकसर माहा |
| ता सरवडे | | जन |
| मल्जी गावडे गौड | | |
| वस्ती राजोली ता | | हरी कृष्ण |
| फलण | | आा कर्नाम |
| यवाजी होलमणे वाढि | | देशकुलकर्णी / रायाजी विश्वनाथ |
| १०] तराडगा ता फलण | | काळे / जानीव त्र्यंबक |
| ससोजी गायरे पाटील | | गद्धनी |

मौजे मणुर ब्रा ता वाई
कासोजी गाजरे पाटील
मौजे पारनेर पा हुजर
सुभानजी रणनवरे पाटील
मौजे राक पा सासवड
संताजी सिंदे
शामजी कायदेव वावरे
पाटील कसबे कुडाल
विष्णु अचार्जी

## मोकासाई

| | |
|---|---|
| अंताजीराव पेडावकर | सभाजीराव पेडावकर |
| तानाजीराव वाडकर | येसाजीराव वाडकर |
| गगाजीराव तिवरेकर | धारोजी राव तिवरेकर |
| रादाजीराव व रामाजीराव अडिरेकर | सूर्याजीराव नादिवसेकर |
| भानोजीराव ठेरुकर | सूर्याजीराव वोवलीकर |
| तानाजीराव रुद्राजीराव कादवाडकर | |

कृष्णाजी व रामजी इगवला
वस्ती मौजे दलवठणे

गोविंद रघुनाथ निशावन
कसबे मजकूर
अंतो परशराम व निळो
नरसींह पतकी जकात
मजकूर
गगाधर हरि

## उदमी कसबे मजकूर

| | |
|---|---|
| तिमाजी नाइक देउसकर | त्रिंबक नाइक चिखले पोतदार मीठचद्र मजकूर[१० |
| नारोबा नाइक | नारोबा खोडगडा |
| बालदेव | माहाजन |
| गणो अचार्जी | परशराम मोहिता |

## वकाल कसबे मजकूर

| | |
|---|---|
| लखसेट चौधरी | गोदसेट वाटकर |
| बालसेट पोतदार | जेतसेट माहाकाल |

## ता जमाती

हसजी वणगा अलजी देसाई
हसाजीराव व बावाजीराउ पाळाडे ता कासार [२०
भीकसेट

## ता सोनार

कृष्णसेट सेटिया

## ताफे गौली

संभु म्हेतर हर गोली टसाल

## ताफे साली

सभु ताबिया विठोजी काचली
तुकसेट बेलकरी कसबा

## ताफे साठिये

आबाजी म्हेतर इसुफजी म्हेतर[३०

ठाण्गे ता। मजकूर
गुरुकोजी पट मामदजी कु
पेट

सांगिये जकात चौधरे मजकूर
कानोजी डांगी येलोजी डांगी
भिका तेली कसबे मजकूर
कानसेट मेहतर सिंपा
निला व धाग परीट
हजाम मेहतर
१०] तेज माहाला व राम माहाला
जोग सालवी व वाजे कुंभार
पिला वावरी
पिलभा गुरव भेरदकर
लखमोजी गुरव केदारकर
सया माहार कसबे मजकूर

जाहला माहाजर ऐसा जे पाकोजी धागेरा व मानाजी धागेरा वस्ती मौजे दलवठणें ता। मजकूर हाली वस्ती मौजे सिदी ता। मलवडी अमवादी वादुजी बिन गुकोजी सावलकर व वाजी सावलकर वस्ती अपली ता। मलवडी परथमवादी या उभयतामध्यें पेठ धणगराची ता। मजकूर येथे त्याचे वर्तीलपणाचे गाउहिकीचा २०]बेव्हार लागला म्हणम माहत ता। मजकुरास आले गोतामध्य मनसुर्वास उभे न राहाता पाकोजी धागेरा व मानाजी धाटेरा हे दोघेजण राजश्री गणेश माहादव हवालदार ता। मजकूर यासवद येउन उभे राहिले त्याचा गात मेलवग हदु जणाच्या तफरीत लिहीन घेतल्या छ २० माहे रजब

पाकोजी धाटेरा व मानाजी
धागेरा अमवादी याणी त
करीर केली की ता। मजकूरचे
पठेप गावपेपण पुरातन
आपलें चालत आलें ऐसे
पासी माहाराज राज
१०] श्री केलासवासी
छत्रपती ? मीथी गर्भ

वादुजी सावलकर व वा
जी सावलकर परथमवादी
याणी तकरीर केली की
पेठ मजकूरचे वर्तीलपण आपल
पिढी दर पिढी चालत आल
आह पिढ्या
१ रायोजी
१ गोसाजी

कथिजात जाहाली ते सम-
ई केशवसेट सेटे ता। मज-
कुर गाव टाकून कन्हाड प्रांते
गेले ते समई आपला बाप प
दाजी धाटेरा सेटिये बाहीर
पडिले म्हणून घाटावरी गेला
तेथे पदाजी धाटोरा मरोन गेला
आपण लाहान होतों कोंकणात
यावया फावले नाही वरकड
धणगर पेटेस येत च होते त्या-
मध्ये तुकोजी सावलकर वडी-
लपणाचे पान घेउ लागला हे
वर्तमान आपणास कळले त्यास
आपण हि पोख्ता जाहालो म-
ग आपण हिंदलवटगे यासी
आलो तुकोजी सावलकर याची
पेठ आली फरोख्त जाहालिया-
वरी घाटावरी जाता दलवठणें
येथे भेटला तेथे हटकिले की
आपले वडीलपणाचे पान का
घेतोस ऐसे बोलिलो त्यास
वाद सांगो लागला मग माण-
कोजी जमादार याजवल उभा
राहोन तुकोजीस आणविले त्या-
णे हरदु जणाचा कथला आइकोन
त्याणे सागितले की तुकोजीस
पान घ्यावया निसबत नाही
आम्ही घाटोरियांनी वडील-
कीचे पान घ्यावे ऐसें केले
याउपरी बादजी सावलकर याणे
आपल्या पिढिया सागितल्या
त्या लटिक्या याचा आजा

१ सिरसोजी
१ बादजी
१ तुकोजी
१ नली बादजी

६

येणेप्रमाणे आपले वडीलपण
पिढी दर पिढी चालत आले
आहे मध्ये बाकोजी धा-
टोरियाने आपला बाप तु-
कोजी यासवे दलवठणियात [१०
कथला करून माणकोजी
जामदार मोजे मजकुरी
होता त्याजवळ आपल्या
बापास नेऊन बोलिला की
धाटोरे दलवठणियांत रा-
हातात आणि तुम्ही येऊन
यासी न भेटता जाता येता
वडीलकीचे पान घेता म्हणू-
न हटकिले त्यावरी हरदु ज-
णाचा वाद जाहाला पेठ को- [२०
ण तागायत चालते आणि द-
लवठाणियात वस्ती कधी हे
जातीची बोलणे जाहाले त्याव-
रून त्याणे घाटोरीयास ल-
टिके केले आपल्या बापास
सागितले की तुम्ही जैसी
पेठ घेऊन येता तैसे येत
जात जाणें त्यावरी आपणास
कोणी अटक केले नाही अ-
गर दुसरा कोणी पेटेस आला [३०
नाही पहिल्यापासून चालत
आले आहे तैसे चालवीत
आहो साप्रति हालि बाको

यादजी सावलकर वरकड धनगर येतात ते जासीने ये उ लागले त्यामागे सावलक रांचे कोणी येत महुते सांमति वडीलपणाचे पान घेतो तक रीर सही

जी व मानाजी धागेरा कय लियास उभा राहिला घागावरी दोन तीन स्थली मनसुपी मा डिली परंतु जाहाली नाही उभे राहिला परतु घाटोरा समजेना झाली येथे आला आहे हे त कर्रार सही

येणेप्रमाणे तकरीरा लिहोन दिल्या त्याउपरी गोताने हरदु जणासी पुसिले की, घागावरून दोन तीन स्थलीहून मनसुपीस उभे राहोन फिरत आलेत याउपरी हे स्थलीचा मनसुची मनात असेल तरी मान्यपत्रे लिहोन देणे त्या उपरी हरदूजण
१०] स्थलास मान्य होऊन राजीनामे लिहोन दिले की चिपुलणचे स्थली मनसुची निवडील त्याप्रमाणे राजी जो माहके कथला करील तो गोताचा वाही व दिवा णचा अन्यायी म्हणून हरदूजणानी राजीनाम लिहोन दिले दुसरे दिवसी मनसूपीस गोत मिळाले मनसूपीस हरदूजण उभे राहिले मनसूपीमुळे वृद्ध वृद्ध साक्ष ममासी आणिले

तुकसेट कामाकट येलकरी कसबेमजकुर उमर वर्से ७०।७५ बोलिलाकी यकोजी घागेरा व मानाजी याचा बाप पद्माजी यास
२०] सेटीने वडीलकीचे पान दिले परतु भोगवटा का राहिला हे कळत नाही म्हणून बोलिला
याकुबजी जमाती व कानोजी डांगीया उमर वर्से ६०।६५ बोलिले की सावळकर पेठ घेऊन येतात पान सावळकरास दिवाले देले म्हणन हरदूजण बोलिले

जोसी उपाध्ये ब्राह्मण वतनदार यासी पुसिले त्यास ते बोलिले की हा दिवाणगाचा विचार आ णास न कळे परत बाला धार्गी धगार येतात त्याही आपल्या वडिलास धमादायपत्र दिले होते त मनास आणून सांगो त्यावरून पत्रे आणिली तेथे मकसूदराम पद्मनाभ तरजोसी बिन रघुनाथजोसी मुरा हरिहर अर्पेन अल्प सैचे सीरतोजी व भानजी व रायोजी व काट जी समस्त धनगर सेकान अवर्दा व सीदी व याने मुकाम आदि पत्र मजकूर लिहोन दिले की भगोसाची मनिवर्दी बिन्हासास

१०]

अंतार्जागरत गरली त्याजा
मौजे पेठार्से व त्याजी-
गप मोगमाई अद्रेकर
व याजे मोकासाई बोलिले
की घाटोरे ठावके नाही
नावळकर पेठ घेऊन
येतात आम्हास ठाउके
आहे

एकुन तीथ चार नक्षत्र सागतात
म्हणुन कारनिराच्या नगाम १३
रुके चक्र धर्मादाय करून दिला
त्या पत्रावरी निशानी

| | |
|---|---|
| सिरनोजी | गगोजी |
| भानजी | काळोजी |
| कवाजी | मालजी |
| बाधजी | नभाजी |
| नागजमिगर | एडोजी |
| माल गावडा | तकोजी |
| नटोजी इळा | रत्नोजी |
| बादजी पितळा | म्हाकोजी |
| सिद गावडा | कमाजी |
| दळवटणेकर | मालजी मगर |

येणेप्रमाणे गोही जाहाल्या त्यावरून सभासद गोत याही विचार केला की घा-कोजी घाटोरा याणे तकरीर केली जे बादजी सावळकरापासून सावळकर कोकणात टाही धणगर येतात ते जानीने येतात ऐसीयास नावळकराच्या वडिली कसबे मजकूरचे जोसीयास धर्मादायपत्र करून दिल्हे आहे तेथे नाव सिरसोजी आहे ऐसी-यासी पत्र जे करून दिल्हे ते वडीलराणा येवळ देवन नाही त्यावरून घाकोजी घाटोरा याची तकरीर लटकी जाहाली सावळकराचा भोगवटा चालत आहे व गोही आहेत याव-रून सावळकर खरा दिसतो घाटोर याचा भोगवटा नाही एक तुकसेट येलकरी म्हणतो की केशवसेट सेटेया वडीलकीचे पान घाटोरयास दिले ऐसीयासी दळवटणेयामध्ये धणगर नादत होते त्याची गाउडकी दिली की कसबियाचे पेठेचे दिले हा सिधात तुकसेटीस न कळे जर कसबेयाचे पेठेची गाउडकी वडीलपण दिले असते तरी काही दिवस भोगवटा चालता तो हि नाही याउपरी माणकोजी जामदार म्हणजे लस्करचा याजवळ घाटोरा उभा राहिला तर कोशाचे अंतरे माहाल असोन जामदाराजवळ उभे राहावे हा हिसाब नव्हे व देसक सेटे माहाजन माहाली होते तरी पेठेस एऊन कोणास हि भेटला नाही वर्तमान हि दखल केले नाही उपरी घाटोरा दळवटणेयामध्ये नादत होता परंतु कसबेमजकूरचे पेठेचा भोगवटा नाही यावरून घाटोरा वातील ऐसे दिसोन येते त्याउपरी घाटोरा बोलिला की आपणास गोही साक्षपत्र भोगवटा नाही म्हणता तरी आपण दिव्य काढीन पांढर हात देईल तरी पेठेची गाउडकी करीन खोटा जाहालो

मरी आपण व नायाहीर होईन ऐसे बोलोन गैरहाजार जाहाला त्या उपरी कार्तिका दिवशी राजश्री माहादाजी मलाल समासद नामजाद सुभा ग्रामोळ व जवळ पागोरा उभा राहिला त्यावरून मागता सुभाहून देशक व महस्त व लस्करी लोक पाटील मिरासदार ऐसे समस्त गोत मेळऊन श्री देवस्थानजीक मनसपीत बैसले हरदूजणाच्या तकरारा मनास आणून गोही मोघे पाहोन मागती सदर्हू मनसुबा प्रमाणे निवाडा जाहला व माणकोजी जामदार याणे मनसपी केली ते वेळेचा गोही एमाजी सींदा मौजे दळवणेयामध्ये आहे म्हणून बोलिला त्यावरून तो आणून मोघा मनास आणिला त्याणे तकरीर केली की हरदू पणगा त्या जवळ उभ राहिले मांडत होते परंतु माणकोजी जामदार याणे एक सग व सोगा केला नाही म्हणून तकरीर केली त्यावरी समासद याही पागोरियास सांगितले जे तू वतनास लायक नाही त्यावरी पागोरा बोलिला की आपण रवा काढीन यामुळे निवडेल त्याप्रमाणे वतणूक करीन हे वर्तमान राजश्री सुभेदारी गोतमुख पिसास आणून विचार केला कां हरदूजणाजवळ पत्र नाही अगर गोही प्रधा नाही पागोरा न समजे रवा काढीन म्हणतो ऐसीयास रवा दिव्यायेपळे समजत नाही त्यावरून पागोरे याही रवा काढावा यादजी सावळकर याणे सावली करावी ऐसा ठराव करून छ ११ माहे शोवली रविवारी नजीक जुमामसीद कसबे मजकर एथे राजश्री माहादाजीपंत सुभेदार व राजश्री बालाजी विश्वनाथ समासद व राजश्री गणेश माहादेऊ हवालदार व कारकून ता मजकूर व लोक हुजरात व लस्करी पाटील व देसक महस्त गोत बैसोन पागोरेयास रवा दिल्हा बाकोजी पागोरा याणे रवा काढिला यादजी सावळकर याणे सावली केली बाकाजी पागोरा रव्यास लागला आणि सोगा जाहाला म्हणून त्यापासून गुन्हेगारी व यादजी सावळकर हे खरे जाहाले म्हणून पारासून हरकी एकून हरदूजण वादियापासून गुन्हेगारी व हरकी दिवाणांत घऊन सुभेमजकुरी कमाविस केली सदर्हूचे कोल दिवाणचे भलाहिद असेस यादजी विन तुकाजी सावळकर व याजी विन सहोजी सावळकर यांचे वतन याच हवाला केले पुत्रपौत्री ता मजकूरचे पडेची गाउकी यदालरग चालवावे जाहाला महसर सही

~ ~~~ ~

## लेखांक २

श्री

सेवेसी पत्रदार कसप चिखून ता मजकूर तालुके अंजनगाव क्षेत्र भीवराय राम कृतानेक विज्ञापना ऐसी जे श्रीमंत फेरासवासी बाजीरावंत मात देशनुस मामले दंडाराजपुरी हे कसबे मजकुरी आले ते समई आम्हा जागा मेमून दिल्ही सब पर बांधोन राहिले धामद्याचे दंगामुळे परवाडी आले ती जागा सात्गुदाग्या मात

सर्वही संग्रह । तुकोबाच्या वह्या । जावें लवलाहें । तुम्हीं तेथ ॥ ४८ ॥
आज्ञा घेऊनिया । भावार्थे निघालो । देऊळासी आलो । विठोबाच्या ॥ ४९ ॥
देखोनिया देव । आनंदलें मन । ऐकिलें कीर्तन । सनामुखें ॥ ५० ॥
कथा जाल्यावरि । देखिलें कौतुक । मोटें आलौलिक । सांगवेना ॥ ५१ ॥
प्रत्यक्ष तुकोबा । करीतसे कथा । आनंदें सर्वथा । डोलसते ॥ ५२ ॥
कर्दळी हेलावे । जेसी चंड वातें । तैसें तुकोबाते । देखियलें ॥ ५३ ॥
भास गेला ऐसा । माझिया मनासी । पडेल भूमिसी । काय करू ॥ ५४ ॥
म्हणुनीया खांदा । घेऊनि आवरी । चळें ही सावरी । आवरेना ॥ ५५ ॥
ऐसा धीर केला । एक म्यां प्रहर । जालेसे शरीर । क्षीण मात्रें ॥ ५६ ॥
जाणिनला भाव । आणि व्यापकें । कथा कौतुकें । पूर्ण केली ॥ ५७ ॥ [१०
ठेविवला माझ्या । माथ्यावरी हात । स्वयं जाला गुप्त । स्वप्नामाजि ॥ ५८ ॥
तेथुनिया स्फूर्ति । तुकोबानें दिल्ही । येरदिमी केली । कथा दर्ने ॥ ५९ ॥
स्वर ताळ ज्ञानें । नव्हेन ठाऊकें । कथा कौतुकें । करविली ॥ ६० ॥
व्यथा जे जे होती । ते ते सर्व गेली । प्रचित घडली । माझी मज ॥ ६१ ॥
मग म्यां सोडीली । लोकीकाची लाज । इतरासी काज । काय माझें ॥ ६२ ॥
ब्राह्मण म्हणती । यासि काय जालें । काही संचरलें । महद्भूत ॥ ६३ ॥
बापापासी द्वेषें । सांगती गान्हाणें । तुमच्या पुत्रानें । बुडविलें ॥ ६४ ॥
लाज येते आम्हा । वैदीक आमचा । पुत्र हा तुमचा । म्हणुनीयां ॥ ६५ ॥
नाचतो बाजारी । यासि शिक्षा करा । येऊ नका घरा । दरू तुम्ही ॥ ६६ ॥
भलत्यासि कैसा । करितो नमन । देतो आळींगन । लहूवर्णा ॥ ६७ ॥ [२०
ऐसें ऐकिलें । ब्राह्मणाच्या मुखें । अंतरीं त्या दुःखें । कष्टी जाले ॥ ६८ ॥
बोलति कष्टोनी । क्रोधे तीर्थरूप । कैसा पापरूप । पोटा आला ॥ ६९ ॥
त्यासि पढविलें । सर्व सिकविलें ॥ वृथा वाया गेलें । काय करू ॥ ७० ॥
कष्टाचें सार्थक । माझ्या जालें नाही । म्हणतानि देही कष्टी जाले ॥ ७१ ॥
सांडि करुनिया । वेगळे घातेलें । अन्नवस्त्र दिल्हे । थोडें बहु ॥ ७२ ॥
सनासि करिती । गाळीप्रदानाचें । अर्भक आमुचें । वेडें केलें ॥ ७३ ॥
वाळींत घालावें । कोण्ही बोलिरले । मजपासी आले । कैसें आतां ॥ ७४ ॥
आवश्य म्हणुनी । आज्ञा म्यां दिधली । उकि तों सुटली । ब्राम्हणाची ॥ ७५ ॥
सांभाळाया आले । हरिभक्त कोण्ही । देखिले दुरूनि । दिनवाणें ॥ ७६ ॥
चिंता नको करू । असीर्वाद देती । धन धन्य येती । आपे आप ॥ ७७ ॥ [३०
आसीर्वाद त्यांचा । मानिला विश्वासें । जीव श्वासोश्वास । दाटलासे ॥ ७८ ॥
ईश्वराची माया । कोण्हाही कळेना । प्रेषिलें सदना । पत्र पती ॥ ७९ ॥
नारायणें दील्हा । चऱ्होली मोकासा । जालासे भर्वसा । आहे देव ॥ ८० ॥

इच्छा जाली चित्तीं । निस्पृह असावें । स्थळ पाहिजे देवें । तत्त्यापासीं ॥ ८१ ॥
काय तोयाची ना । सकंप म्या केला । देवें सिद्धि नेला । पण माझा ॥ ८२ ॥
शिहीर सगाची । ऐसी जाला वांछा । देवें तेही इच्छा । पुरविली ॥ ८३ ॥
पुजाविषी वाटे । महाविष्णुमात । देवें अवचित्ती । तेही दीली ॥ ८४ ॥
निरनीग असावें । स्थळ कथेसाठीं । देवानें सेवटीं । पुण दीलें ॥ ८५ ॥
अग्नि होत्र घ्यावें । स्माथाग्निनहिन । देवान साहित्य । पाठविलें ॥ ८६ ॥
करावीसी वाटे । स्वयें देवस्तुती । देवें दिल्हा स्फूर्ती । कवित्वाची ॥ ८७ ॥
जो जो हेत माझा । मनामाजि यतो । तो तो पुरवितो । स्वामि माझा ॥ ८८ ॥
कोठें ही अंतर । पडो नेदी काहीं । सखारार्था नाहीं । मज चिंता ॥ ८९ ॥
१०]माझा अंगीकार । पूर्ण देवें केला । अनुभव आला । अंतराची ॥ ९० ॥
मागें पुर्वे देव । मज सांभाळितो । बाळानें पाळितो । माय बाप ॥ ९१ ॥
आतां पगारण । करू कासयासाठीं । हृदयसंपुटीं । आला देव ॥ ९२ ॥
माझा योगक्षेम । चालवितो देव । त्यासि अहंभाव । पण माझा ॥ ९३ ॥
त्याणें उणें काहीं । केलें नाहीं मज । इच्छिलें सहज । पावलों मी ॥ ९४ ॥
स्नानसंध्या माझी । नित्य चालवितो । कथा करवितो । अहोरात्री ॥ ९५ ॥
जाऊं नेदी कोठें । आपल्या वेगळें । न धरी निराळें । बाळकासी ॥ ९६ ॥
संकटाचा काहीं । येऊं नेदी वारा । वारितो परभारा । स्वामि माझा ॥ ९७ ॥
होणारासारिखी । करितो सूचना । सावधितो दीना । होई जागा ॥ ९८ ॥
किती उपकार । आठऊं स्वामिचे । सव सम वाचे । आगणित ॥ ९९ ॥
२ ]अनंत महादोषें । व्यापूनि मरला । पुरोनि उरला । तिगधाची ॥ १०० ॥
इच्छाविना काहीं । पानही न हाले । जग चाले बोले । सत्ता त्याची ॥ १०१ ॥
हानी मृत्यु लाभ । उत्पत्ति प्रळय । स्थिति समुदाय । कळा तोची ॥ १०२ ॥
पाचा पार वर्णी । ऐसा आहे कोण । शेषाही संपूर्ण । वणवेना ॥ १०३ ॥
वेद नेति नेति । स्तविता सिणले । तटस्थ राहिले । अधोमुख ॥ १०४ ॥
ब्रम्हादिक अंत । पाहतां भागले । साधक शिणले । ठाई नाहीं ॥ १०५ ॥
तथापि कृपा करी । जरी दीनावरा । मुक्ति मुक्ति त्यान्ही । दासी होती ॥ १०६ ॥
धर्म आहे थोडें । स्वामीचें आहका । भक्तिमार्ग एका । वश होतो ॥ १०७ ॥
कलयुगामाजि । वर्णाश्रम धर्म । करनि सत्कर्म । आचारावें ॥ १०८ ॥
ऐसें दयानिधी । करा करविता । नित्य चालवितो । महाविष्णू ॥ १०९ ॥
१०]पुढील प्रसंग । जाणे नारायण । अवस्थेचा प्रश्न । ऐसा आहे ॥ ११० ॥
पुढेंचे उत्तर । पदावितो देव । चाले अनुभव । कथेश्वर ॥ १११ ॥
॥ इति आदिकथानुसंधानअवस्थाप्रश्न शुभमस्तु ॥ ७ ॥ ७ ॥

पां म वडवर्धन

१ ही मूर्ति सेहास आहे

# ६३ कचेश्वरानें पाडलेला पाऊस

कचेश्वरानें आपल्या सामर्थ्यानें पाऊस पाडिला अशी एक दंतकथा रा. राजवाडे यांनी 'मंदिरां'तील कचेश्वरावरील आपल्या लेखांत दिली असून, सदर कवीवर कोणा कवीनें रचिलेल्या एका अष्टकांत हि असाच उल्लेख सांपडतो. श्री रा. गणपतराव जगन्नाथ ऊर्फ आबासाहेब राजगुरु इनामदार, अतीत, यांचेकडून कांहीं ऐतिहासिक कागद मला मिळाले त्यांत च खालीं दिलेले दोन्ही कागद होते. साधुसंताचा पंचमहाभूतांवर हि पगडा चालू शकतो यासंबंधींचा प्रत्यक्ष पुरावा म्हणून कोणी हे कागद शिरीं धारण करतील. तर कोणी हे फक्त काकतालीयत्व होय असें आग्रहपूर्वक प्रतिपादितील. अशा प्रकारचे हे दोन्ही उद्देश कसे व कितपत साध्य होण्यासारखे आहेत याचा प्रस्तुत विचार न करितां, पूर्वकालीन महाराष्ट्राच्या [१० सामाजिक व धार्मिक मनाचा ठाव घेणाऱ्या भावी इतिहासकाराकरितां हे दोन्ही कागद येथें सादर केले जात आहेत. ज्यानें त्यानें या कागदांचा आपापल्या इच्छेनुरूप खुशाल उपयोग करून घ्यावा.

शके १६०७ माघ शु ७ बुधवार रोजचे पत्रावर चाकण परगण्यांतील चौसष्ट गांवच्या च मोकदमांच्या निशाण्या आहेत, तेव्हां संभाजीमहाराजांच्या राजवटींत चाकण परगण्यांत फक्त चौसष्ट च गांवें होतीं कीं काय हें समजत नाहीं. इतिहासदृष्ट्या हा हि प्रश्न विचार करण्यासारखा आहे. तसें च सदरहू चौसष्ट गांवांतील तत्कालीन मोकदमांचीं नांवें येथें एकत्र अशीं दिलेलीं नव्यानें सांपडतील.

## लेखांक १ [२०

स्वस्ति श्रीनृप शालीवाहन शके १६०७ क्रोधननाम संवछरे माघ शुध ७ सप्तमी बुधवार ते दिनी वेदमूर्ती राजेश्री कचेश्वर भट बिन मिथेश्वर भट ब्रम्हे उपाध्ये कसबे चाकण यासी येसाजी वलद संताजी व विठोजी वलद बाबाजी देशमुख व नागोजी चद्रस व बाळाजी बापूजी देशपांडिये व समस्त मोकदम देहाये परगणे मजकूर दंडवत अनुक्रमे नमस्कार सु॥ सन सीत सन १०९५ कारणे आत्मसंतोषे पत्र (ले) हून दिधले ऐसे जे सालमजकुरी पर्जन्य मुतलक गेला या निमित्य किलेदार व फौजदार साहेबी अम्हास फर्माविले (ले) की पाउस गेला या कारणे कसबे मजकूरचे व परगणे मजकूरचे समस्त ब्राह्मण मेळउन आनुष्ठान करउन प (र्ज) न्य पडे ऐसे करणे त्यावरून समस्त ब्राह्मण मेळउन अकरा दिवस अनुष्ठान केले परंतु पर्जन्य न पडे त्यावरी समस्ता ब्राह्मणानीं व्यगोक्ती केली की अमचे मुख्य महंत त्यास अम्हामध्यें आणिले पाहिजे त्यावरून स्वामीस आम्ही अनुष्ठानाच्या ब्राह्मणांत घेऊन अलो त्यास स्वामींनीं उतर दिधले कीं या ब्राह्मणास अज्ञा देणे आणि हनुमनाचे देवळी अनदागिरीचे मठी हरिकथेस मडप दे (णे) कथा परमेश्वराची [३० करून देवाचा धावा करून म्हणिजे पर्जन्य पडेल संशये नाही ऐसी स्वामींनीं प्रतिज्ञा

केली त्यावरून अपण समस्त मिळोन हारिकथेचे साहित्य केले स्वामीनी कथा अरंभीताच पर्जन्य आरोराप्र पडला पुरे पुरे केल आम्ही समस्त सुख पावलो त्यास स्वामीचे कांही उतराई जाले पाहिजे म्हणऊन कसबे मजकुरीं व परगणे मजकुरीं दर गांवास रुकाधाग्री एक १ व धान्य मण ०१ येक यणप्रमाणे करून दिधले असे पुत्रपौत्रादि वंशपरपरेनें दर हरसाल पावर्दीन जाऊन यास अन्यथा करून अथवा अमचे वंशपरपरेचा होऊन पुढे अन्यथा करील त्यास श्री ची व कुळस्वामीची व आपल्या पूवजांची व गोब्राह्मणांची आण असे हे पत्र लिहून दिधले सही तेरीख ५ माहे रबिलावल वली ३१

## गावगणा मोकदम नायनिसी वितपसील

१०] कसबे चाकण मोकदम
कदु देशमुख १

मौजे काळेस मोकदम
१ रतमाजी पा पोवळा
१ सुकोमी पा पोवळा
२

मौजे भोसे मोकदम
१ सायाजी पटद सताजी
१ मकाजी कुंरे
२

कसबे इदुग मोकदम
१ गयाजि पा पवार
१ गगा जी पा फाताद
२

मौजे जायोंडे मोकदम
गेमाजी पा तागड १

मौजे आगरी मोकदम
रगोजी पा लोंढा १

मौजे अवळे मोकदम
भानजी अभोरा १

मौजे कोयेळी मोकदम
१ तिमाजी कासार
१ नागोजी धणगर
१ त्रिंबकजी भाडला
३

मौजे सिरे मोकदम दावलजी
वलद हणमाजी मोढवा १

मौजे सिदे मोकदम
१ कोंताजी पानबद
१ मावजी धणवट
२

मौजे सेलगाऊ मोकदम
येसजी वलद नावजी आवटी १

मौजे सांगुरडी मोकदम [१०
माहादजी वलद दावजी भिसा १

मौजे पिपळे मोकदम
१ आपाजी बैलभर
१ राजजी जगथाप
१ बहिरजी वाा
३

मौजे सालुचरे मोकदम
रखमाजी बिरादर तुकोजी बोतरा १

मौजे गोलेगाऊ मोकदम
१ बापुजी वाा रायाजि चौधरी
१ माणकोजी चौधरी
२

मौजे सावरदरी मोकदम
१ भिवजी वाा माणकोजी कणसा
१ केरोजी राऊत
२

मौजे सोळु मोकदम येस
पाा वाा फिरंगोजि पाा ठाकूर १

मौजे भाबोली मोकदम
कोताजी राउत १

मौजे चन्होली मोकदम
मोराजी पाा थोरवा १
३२

मौजे अबेठाण मोकदम [२०
पिलाजी पाा माडेकर १

मौजे केळगाऊ मोकद्दम
१ धारोजी मुगसा
१ पद्माजी मुगसा
२

मौजे सेलु मोकद्दम
जागोजी ठोबरा १

मौजे माहाळुगे मोकद्दम
१ भिवजी पा जयेतजी
माहाळुगेकर
१०]१ गादजी पा सूर्याजी सिवळा
२

मौजे वेलवाडी मोकद्दम
१ माजी पा पा भिनाजी गाडे
१ रेतोजी पा घोतरा
२

मौज गानवडी मोकद्दम
बाबाजी सार्गीक १

मौज पिंपरी बु।। मोकद्दम
१ रामाजी पा ठाकूर
२०]१ साबजी पा ठाकूर
२

मौजे तळेगाऊ मोकद्दम
२ वामाडे
१ बापाजी पा पा मेघजी
१ देकोजा
२

मौजे किवळे मोकद्दम
सिरसोजी पा सीवळे १

मौजे कुरळी मोकद्दम
१ मुधोजी माळी
१ १ तिमाजी पा तुकोजी सोमवणी
२

मौजे कारेगाऊ बु।। मोकदम
येस पा पा सूर्याजी डाबरा १

मौजे असखेडे बुद्रु मोकदम
परसोजी भिभोरा १

मौजे मुदल्वाडी मोकद्दम
बाजी पा फरजद येसाइ १

मौजे कान्हेवाडी मोकद्दम
१ म्हाळोजी पवार
१ मुगोभा बाग्मेडा
२

मौजे भिकार पडगो मोकद्दम
परसोजी पा पागोड़ा १

२ भेगडे
१ बाळोजी वा भिमजी
१ हरजी वा बावाजी
—
२
—
४

मौजे सिरोली मोकदम
मोत्याजी आहिरराऊ १

मौजे वांकी खुर्द मोकदम
कमळोजी वा कान्होजी कडू १

मौजे रासें मोकदम
१ विरोजी सिदा
१ मालजी मुगसा
—
२

मौजे वडगाऊ घेणद मोकदम
सूर्याजी पा घेणद १

मौजे दायवडी मोकदम
१ भिवजी वा जोमाजी पा गाडगे
१ तुकोजी वा बावाजी पा गाडगे
—
२

मौजे करंदी मोकदम
१ गणोजी पा दरेकर
१ मल्हारजी चिरादर
पिलाजी ढोकळा
—
२

मौजे वराळे खुर्द मोकदम
नजीक इंदोरी
१ माऊजी मन्हाश्रा
१ चोतरा मोकदम
—
२

मौजे आंबी मोकदम
१ अनाजी मल्हार
१ कान्होजी वा रायाजी दरेकर
—
२

मौजे नाणोली मोकदम [१०
सूर्याजी पा लोढा १

मौजे कल्हेंट मोकदम
१ रायाजी आगलावा
१ पिलाजी करवद चौगुला
१ सिऊजी मोरे पा
—
३

मौजे कोये मोकदम
पदाजी पा राळा १

मौजे कुरकुंडी मोकदम
हरजी भोकसा १ [२०

मौजे वासोली मोकदम
१ सत पा। फरजद
१ फरजद भोर
२

मौजे मळकर मोकदम
१ दागोजी पा। लोखंडे
१ नावजी पा। लोखंडे
२

मौजे वराळे युा। नजीक मावोली
१०]मोकदम मलजी वुषा १

मौजे वानोरे मोकदम
१ पदाजी गावडा
१ सिवजी वा। मालजी गावडा
२

मौजे वालीज मोकदम
माऊजी पा। कारला १

मौजे पीरदवडी मोकदम
१ गिरजोजी पिरादर रायाजि पा।
१ मायजी पा। काळडोके
२०] २

मौजे मोये मोकदम पनाजी
गोवारी १

मौजे निघोजे मोकदम
१ मालजी पा। वा। मावजी येल्होडा
१ भिवजी येल्होडे
२

मौजे असखेड युा। मोकदम
पदाजी गाडे १

मौजे पिंपळगाऊ मोकदम
अंकुस पा। वा। रामाजी चौधरी १

मौजे कोरेगाऊ खुर्द मोकदम
मोवाजी पा। कदूसकर १

मौजे आळंदी मोकदम
१ नावजी घुडरा
१ पदाजी कुन्हाडा
२

मौजे पिंपरी खुर्द मोकदम
फरजद येसाजी कामा १

मौजे चिपळी मोकदम रम पा। जेंद १

मौजे रोहकल मोकदम
१ मावजी वा। सोनजी कावळा
१ पदाजी धोमेरा
२

मौजे वाकी युा। मोकदम
सान्ताजी वा। सायाजि कडू १

मौजे खरपुडी मोकदम राणोजी वा सताजी गाडे १

कसबे खुदुबरे मोकदम दस पा गाडा १

सदरहू लिहिल्याप्रमाणे समस्त मान्य असो प्रतीवर्षी स्वामीचा परामर्ष करून लेकराचे लेकरी पावीत जाऊन हे पत्र लिहून दिधले सही

चिा जाखो विटल गुं॥ मोहरीर
देसपाडिये पा मजकुर

~~~~~~~~~~

## लेखांक २ (शके १६५२)

श्री

श्री
वार्धिष्णुर्विक्रमै
र्विष्णोसामूर्तिरिव
वामनी शभु सूनो
रसौ मुद्रा शिवरा
जस्य राजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५६ साधारण नाम सवत्सरे वैशाख शुध पचमी मद्वासर क्षत्रियकुलावतस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी वेदमुर्ती राजश्री [१० कचेश्वर भट बिन सिधेश्वर भट ब्रह्मे उपाध्ये कसबे चाकण यासी दिल्हे वृत्तीपत्र ऐसे जें तुम्ही स्वामीसंनीध कसबे उबरजेचे मुकामी विनती केली जे सके १६०७ क्रोधन नाम संवत्सरी पर्जन्न मुतलक गेला यां निमित्य किलेदार व

० श्री ०
राजा शाहू नरप
ति हर्षनिधांन बा
जीराव बलाळ
मुख्य प्रधान

० श्री ०
श्री आई आदि पुरु-
ष श्री राजा शाहु छत्रप
ति स्वामि कृपानिधि त
स्य श्रीनिवास परशु
राम प्रतिनिधि

फौजदार याणी देशमुख व देशपाडिये व मोकदम देहाये पा मजकूर यांसी सांगितलें [२० कीं पा मजकुरी पर्जन्य गेला या कारणें कसबे मजकूरचें व पा मजकूरचे समस्त
~~~~~~~~~~

माह्मण मेळउन अनुष्टान करून पर्जन्य पडे ऐसी गोष्टी करणे त्यावरून समस्त माह्मण मेळउन आकरा दिवस अनुष्टान केले परतु पर्जन्य पडे ऐसी गोष्टी करणे त्यावरून समस्त माह्मण मेळवून आकरा दिवस अनुष्टान केले परतु पर्जन्य पडिला नाही त्याव रून समस्त माह्मणासी व्यगोक्ती केली की आमचे मुख्य महत आहेत त्यासी आज्ञा मध्ये आणिल पाहिजे त्यावरून त्यानी आम्हास बोलाउन नेऊन सांगितले की, तुम्ही आनुष्टानाच्या माह्मणात मिळोन आनुष्टान करून पर्जन्य पडे ते गोष्टी करणे त्यावर आपण त्यासी उत्तर दिल्हे का या माह्मणास आज्ञा देणे आणि मी हनुमताच्या देवाळइ आनदगिरीच्या मठी मडप देणे तथे कथा परमेस्वराची करू व देवाचा धाव करू म्हणजे पर्जन्य पडेल असावे नाही ऐसी प्रतिज्ञा केली त्यावरून ते समस्त मिळोन
१०] मडप देऊन हरिकथेचे साहित्य केले आपण कथा आरभिताच पर्जन्य आहोरात्र पडिला पुरेपुरे केले आवघे लोक सतोषी जाहाले त्यावरून येसाजी वलद सतागी व विठोजी वलद बापाजी देशमुख व माहोजी चंद्रस व बालाजी बापोजी देसपाडिये व समस्त मोकदम देहाये पा। मजकूर बोलिले जे आपले मनोदय पूर्ण जाहाले स्वामीचे काही उतराई जाहाले पाहिजे म्हणन कसबे मजकुरी व पा। मजकूरी दर गावास टकाशाही १ येक व धान्य उत्तम केली मापे मण ०१ येक येणेप्रमाणे सालिना ययासन लेकराचे लेकरी करून सके १६०७ क्रोधन नाम संवत्सरे माघ शुध सप्तमी बुधवार ते दिवसी शकतपूर्वक पत्र करून दिल्हे आहे ते स्वामींनी मनास आणून तेणेप्रमाणे वृतीपत्रे करून देऊन वंशपरंपरेने चालविले पाहिजे म्हणून विनंती केली त्यावरून तुम्ही मले सत्पात्र थोर
२०] माहापुरुष तुमचे चालवणे स्वामीस आवश्यक जाणून तुम्हाकडील पूर्वील पत्रे बजिनस मनास आणून स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन कसबे मजकुरी व देहाये पा। मजकुरी प्रतिवर्षी दरगावास ययासन करून दिल्हे बिा। शाही टका येक १० धान्य उत्तम केली मापे मण ०१ येकून टका येक व धान्य मण येक येणेप्रमाणे तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरपरेने करून दिल्हे असे तरी तुम्ही सदरहू प्रमाणे कसबे मजकुरी व देहाये पा। मजकूर पैका घेऊन वंशपरपरेने अनभउन सुखरूप राहाणे जाणिजे लेखनालंकार

मया
देर्य रा
जते

हुजूर संमत सौ सौ।
सुर्मत मेर्मा सरकार

तेरीख ३
सौवाल सु॥ सलासीन मया अ॥लफ
बारसुद सुरसुद बार बार बार बा(

पां. न. पटवर्धन

## ६४ कचेश्वराच्या तुकारामावर आरत्या

कचेश्वरकवीकृत पदें, आरत्या वगैरे प्रकरणें मला नुकतीच मिळाली आहेत. आरत्यांपैकी तुकारामावरील खालील दोन्ही आरत्या बऱ्याच प्रसिद्ध असल्यामुळें, व तुकारामासंबधानें ह्यात सहज स्पष्ट उल्लेख आल्यामुळें, त्या मी येथें देत आहें.

कचेश्वरास तुकारामाचा स्वप्नात उपदेश मिळाला असल्याबद्दल सदर [१० कवीच्या आत्मचरित्रात प्रत्यंतर पुरावा मिळतो. पहिल्या आरतीत कचेश्वरानें आपल्या गुरूच्या—तुकारामाच्या—देहयष्टीचे वर्णन केलेलें आहे. तुकारामानंतर लागलीच झालेल्या पिढीतील त्याच्या एका साच्छिष्यानें केलेले वर्णन ह्या दृष्टीने तें इतिहास-संशोधकास व भाविकांस बहारीचे वाटेल. *तुकारामाने आपल्या आंगलटीचें वर्णन कोठें हि केलेले दिसून येत नाही. ते हे येथे पहिल्यानें च प्रसिद्ध होत आहे.

दुसऱ्या आरतीत 'संतात किर्ति केली' येथपासून तो 'जना देख दाविली' येथपर्यंत कवीनें केलेलं तुकारामवर्णन मोठें नामी आहे. तुकारामाचे सदेहप्रयाणाचे बाबतीतील साधकबाधक पुरावा ह्या दृष्टीनें तत्कालिन कवीचा हा उल्लेख हि मननार्ह आहे

(१) [२०

आरती तुकोस्वामी, भक्तिभाव दे नामीं,
ध्यापका गुरुराया, नेई सायोज्यधामी ॥ धृ० ॥
स्वप्नींचें ध्यान दावीं, तुकोस्वामी गोसावी ।
कीर्तनीं जे देखियलें, त्याची सोय बा लावीं ॥ १॥
निर्गूण गुणवता, तुकोराज समर्था ।
मागुती भेटी देई, पायीं ठेवितों माथा ॥ २॥
देखिलें रूप जेसें, तेंचि दावीजे तैसें ।
सावळे रूप बापा, याचें लागलें पीसें ॥ ३ ॥

---

* 'रोडके हातपाय दिसे अवकळा' वगैरे स्ववर्णन श्रीतुकाराम करितात. परंतु तें विनयानें केलेलें आहे. ।चिटणीस

वर्तूळ दोंद पोट, मेघ मालिका मीन, ।
देखिल्या हंस-पंक्ती, लघु आरक्त चोंच ॥ ४॥
उंच ना ठेंगणें हो, ध्यान हेंचि ई राहो ।
मानसीं कचेश्वरा, गुरु तुकोबा पाहो ॥ ५॥

(२)

आरती तुकोराया, नेई विलया माया ।
षड्रिपू मर्दुनीया, लाधि मुक्तिचा ठाया ॥ ध्रु० ॥
सामर्थ्य वर्णवेना, लीळा केलिया नाना ।
रक्षिल्या वह्या जळीं, आतां तारावें दीना ॥ १ ॥
१०] संतांत कीर्ति केली, कुडी सायोज्जीं नेली ।
आश्चर्य थोर केलें, जना देख दाविलें ॥ २ ॥
दीनांचि सारि भूषा, आतां चुकवी खेपा ।
चौऱ्यायशी लक्ष फेरे, कचेश्वराचे बापा ॥ ३ ॥

पांडुरंग नरसिंह पटवर्धन

## ६५ रावबाजी व फुलशहर

पुण्यापासून सुमारें आठ कोसांवर भीमेचे कांठीं फुलगांव या नांवाचें एक लहानसें पण टुमदार खेडेगांव आहे दुसरे बाजीरावाचें हें विलासस्थान असून, येथें त्यांनीं आपल्या आयुष्यांतील बरेच दिवस चैनींत घालविले असल्याचें त्यांच्या राजवटीचें बारकाईनें निरीक्षण करणारास सहज दिसून येईल रंगेल रावबाजींनीं येथें २०]पेशवाई थाटाचा एक टोलेजंग वाडा उठवून 'फुलशहर' वसविण्याचा हि उपक्रम केला होता एवंच श्री बाबासाहेबांच्या कारकीर्दींत या गांवास एक प्रकारें विशेष महत्त्व आलें होतें या गोष्टीस पोषक व समर्थक असा ऐतिहासिक पुरावा रा रा दत्तात्रेय बळवंत कुलकर्णी, फुलगांव, यांचे दप्तरीं मला मुक्ताच मिळाला

श्रीमंतांनीं वाडा बांधण्याकरितां, थळ 'गाडवदरा' यापैकीं दहा बिघे जमीन शके १७३५ आश्विन शुद्ध ५ रोजीं रु १०० यांस महादजी बिन बापूजी व येसाजी बिन आपाजी पाटील खुळे, मौजे फुलगांव, या उभयतांपासून वतनी मिरास करून घेऊन, त्यावर जंगी इमारत उभारली त्यासंबंधीं जें 'पत्र' उपलब्ध झालें आहे, त्यावरून एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत येते ती ही कीं श्री बाबासाहेब आपल्या या खासगी व्यवहारांत 'देशमुख मामले देहाराजपुरी' हा आपला बाहिर

वतनी हक्क नमूद करण्यास विसरत नाहीत. श्रीमंत थोरले माधवरावसाहेबांनी देशमुखी वतनांतील आपला हिस्सा मृत्युसमयीं हरिपंत फडके यांस बहाल करून दिल्याचें ग. व. का. ना. साने यांनी संपादिलेल्या 'पेशव्यांच्या बखरी'त नमूद आहे. हरिपंत फडक्यानंतर त्या हिश्शाची किंबहुना पेशव्यांच्या ह्या वतनाची आजतागायत काय काय स्थित्यंतरें होत गेलीं ही गोष्ट इतिहासदृष्ट्या विचारार्ह आहे. असो. फुलगाव येथें श्रीमंतांनी आपल्या आश्रितांस किंबहुना आपल्या कक्षेतील मंडळीस घरें बांधून दिल्याबद्दलची जीं टांचणें मला मिळालीं आहेत, त्यांवरून कोणत्याहि प्रकारचा पक्षपात न करितां श्रीमंतांनी कोंकणस्थ, देशस्थ इत्यादि पक्षांच्या ब्राह्मणांस घरें बांधून दिलीं होतीं, हें स्पष्ट होतें. इतिहासविचिकित्सकांच्या दृष्टीनें ही गोष्ट मननीय आहे. [१०

लेखांक २ यांत उल्लेखिलेला वाडा, त्याचे पूर्व पश्चिम असलेल्या दुसऱ्या इमारती व बाग हीं ता. ९ माहे डिसेंबर सन १८२९ इ० च्या सरकारी हुकमानें 'ईस्ट इंडियन असोशियन'चे हवालीं केल्याचें सदरील प्रसंगीच्या 'इजारपट्ट्या' वरून दिसतें. ह्या 'इजारपट्ट्या वरून श्रीमंताच्या वाड्याच्या विस्तृततेची साहजीक कल्पना होते. सन १८२९ नंतर ह्या वाड्याची कोणकोणती स्थित्यंतरें झाली हे समजण्यास तूर्त तरी मार्ग नाहीं. परंतु साम्प्रत ह्या वाड्यावर नांगर फिरत असलेला दिसत असून, ह्या वाड्यानें व्यापिलेली सर्व जागा गुळे नांवाच्या इसमाचे वहिवाटीस आहे. वाड्यापैकीं सुमारें दीड हात उंच व चार हात रुंद अशी जिन्याची भिंत काय ती आज उभी आहे। वाड्यालगतची 'पुष्करणी' अद्याप कायम आहे. पुष्करणी संबधानें न्यायदरबारीं 'फैसला' होऊन ती सरकारी ठरल्याचें कळतें. १२ रुपये साऱ्याचा [२० 'सरकारी बाग' येथे च असून कागदोपत्रीं नुसत्या 'बाग' ह्या नावानें ओळखिला जातो. श्रीमंतांच्या आश्रितांपैकीं भिडे उपनामक ब्राह्मणाशिवाय बाकी कोणाचें हि कुटुंब साम्प्रत येथे नांदत नाहीं. हत्तीखाना, शंभर तणी, गावच्या निरनिराळ्या भागांतील अकरा मारुती, नुकतेच उजेडांत आलेले पांच-पंचवीस बदामी आड, सरकारवाड्याची जागा व पुष्करणीचा हौद, श्रीमंतांनीं बांधिलेला प्रचंड घाट व श्रीमहादेवाचें प्रेक्षणीय देवालय ह्या व असल्या प्रकारच्या पेशवाईच्या पडत्या काळांतील अवशिष्ट खुणा इतिहासभक्तांच्या दृष्टीनें एकवार पहाण्यालायक आहेत.

**लेखांक १** श्री

श्रीमंत महाराज राजश्री बाजीराव बाबासाहेब देशमुख मामले दंडाराजपुरी [३० साहेबाचे शेवेस

आज्ञाधारक माहदजी बिन बाबुजी व येसाजी बिन आबाजी पाटील खुळे मोंजे फुलगाव तर्फ साडस प्रांत पुणे

३३

सर्वा देहवल विज्ञापनी ऐसा जे साहेबी मौजे मारी बाडा धायावयाकरितां थत्र गाववदरा येथील माहे हिशार्चा जमिनी प्रो द्वाहा विघे जमीन वतनी करून याव गावितो आज्ञा जाली त्यासवरून साहेबास जमीन यायवाची त्याची मोजणी दर काठी पंधरा तसूचे हाताने पाच हात पाच मुठीयोा काठ्या

तर्फ दक्षण उत्तर काठ्या
गुण काठ्या

रंदी पूर्व पश्चम काठ्या
दर विघा काठ्या
४००

बयाग्से प्रो जमीन विघे
पासी चतु सीमा

१०] पूर्वेस पाणवठ्याचे बोरवा
चां हद्द १

पश्चमेस थत्र मारे या
साहेबी सदरहू जमीन सर्वी
सरांदी घेऊन बाकी जमीन
राहिली त्याचे पूर्वकडील हद्द
१

दक्षणेस पुणेमागाचा रस्ता
पूर्वगाम आहे त्या
चां हद्द १

उत्तरेस सुख्यपूरचा मार्ग या
ची हद्द १

एकूण द्वाहा विघे जमीन चतु सीमायुक्त लिहिल्याप्रा आम्ही आपल रसतोचे ईजादर्सीने साहेबापासून किंमत रुपये १०० एकशे चांदवड घेऊन साहेबास वतनी विरास २०] करून दिल्ही आहे साहेबी सदरहू जमीनीचा उपभोग पुत्रपौत्रादि वंशपरंपरान्ने करावा या जमीनीविसी आमचा आथाआर्था संबंध राहिला नाहीं याविसी कोणी वाली वासाद्दार उभा राहिल्यास त्यासी जाव आम्ही करू त्याणे साहेबापासी बोला बयाच प्रयोजन नाही सद रू द हा विघे जमिनीचा धारा सरकारचा गावचे सिरस्ते प्रो जो येईल तो साहेबी ( सां ) संभाळाचा घेनसाऱ्याचा रुपा अम्हाकडे नाहीं मिा आश्विन शुा ५ पंचमी शके १७३५ श्रीमुखनामसंवछरे छ ३ माहे सवाल सुा आर्बा आसेर मया सेन व आलफ सन १२२३

मिा सखाराम कासीनाथ होनप देशपांडे प्रा मजकूर

माहादजी मिा पायुजी पा गुर्छे
मौजे मार

एसाजी बिन आपाजी पा
सुर्छे मौज मा

१०] ग्वोही सयाचे मिा सखाराम कासीनाथ होनप देशपांडे पा मार

## लेखांक २

ज्यार्ज जिवर्न साहेब बाहादूर इस्कोयेर

कलेक्टर सुभा पुणे याणी.

बनाम ईस्ट इंडेन असोसीयन यासी लिहून दिल्हा इजारपटा ऐसी जे सुरू सलासीन मया तैन व अलफ मौजे फुलगाव तर्फ साडस परगणे भिमथडी येथें सरकारी वाडा व त्याच्या पूर्व पश्चम दुसऱ्या इमारती आहेत ते व बाग सरकारचा मौजे मजकुरी आहे त्या सुधा तुमचे हवाली करावा ह्मणोन सरकारचा हुकूम इम-जोत तारिख ९ माहे डिजबर सन १८२९ इसवींचा आला त्याजवरून सदरहू प्रमाणे तुमचे हवाली करण्याचे त्याचा तपसील व त्याचे वहिवाटीची चितपशील कलमे [१०

इमारती प्रकर्णी तपसील

१ वाडा मौजे मारचे पश्चमेस नजीक भीमानदी वाड्याचे उत्तरेस आहे वाडा दुमजला पूर्व पश्चम लांबी खण सुमार १७ सतरा रुंदी पाच दालने उत्तरेचे दालनापुढें निमपडवी खण सुमार १७ सतरा खुले आहेत त्यावर चुनेगची आहे वाड्याचे दक्षणेस चौक एक पूर्व पश्चम दक्षण तीन सोपे तीन दालणी त्यापैकी पूर्वेकडील सोप्यात दक्षणेचे बाजूस तीन खणावर कौलारु आहे बाकी खण पाटलेले आहेत वर मालवद आहे उत्तरेचे बाजूस सोपा आहे एक दालनी पाटल्यावर माळवद आहे व चौकाचे दक्षणेस सोपा दोन दालणी खण सुमार १७ पो पश्चमेकडील नऊ खण पाटलेले आहेत बाकी पूर्वेकडील आ (ठ) खणास प.से घालून छावणी केली आहे वरते मालवद आहे [२० याप्रो वाडा आहे त्यात दिवानखाने व कोठड्या आहेत चितपशील

१ वाड्यापुढे निमपडवी पूर्व पश्चम खण सुमारी १७ सतरा खुले आहेत वर चुनेगची आहे

१ वाडा दुमजली रुंदी पाच दालनी लांबी पूर्व पश्चम खण सुमार १७

१ पुढील दुघई त्यात कोठड्या सुमारी ३ तपशील

३

१ पूर्वेकडील बाजूस दुदालनी कोठडी एक ए॥ खण पूर्व पश्चम सुमारी ५

१ मध्ये कोठडी येक दुदालनी लांबी पूर्व पश्चम खण सुमार ७

१ पश्चमेकडे कोठडी दुदालनी १ येक लांबी पूर्व पश्चम खण सुमार ५ पांच बाजूस सेतखाणा उत्तरेस आहे [३०

१ मदघर एक दालनी लांबी पव पश्चम सण सुमार १७ पो खुले सुमार १५ पश्चमेकडील पाजस दिवानखाना त्यांत सुरूचे सांबाचे तीन सण दक्षण उत्तर त्याचे पुढे पाच सण दक्षण उत्तर उजेडास खिडकी आहे प श्चमेकडे एकूण कोठडी एक

१ मदघरचे दक्षणेस दुदालनी लांबी पूर्वपश्चम सण सुमार १७ येकूण कोठड्या
१ पूर्वेकडे दुदालनी लांबी सण सुमार ५ एकूण कोठड्या २ तपसील
१ मदघरचे लगत एक
१ सदरहूचे दक्षणेकडे लगत येक त्यात पूव पश्चम सणात टाकी म्हाव पाची खोली आजमासे हात ३ तीन बाजूने उतरावयास पायेऱ्या
१०] आहेत

२

१ मध्ये सात सण खुले दुपई आहेत
१ पश्चमेस पाच सण दुपई आहेत पव पश्चम
१ एक दालण दक्षणेकडील खुले आहे
१ दुसरे दालण उत्तरेकडील त्याचे बाजूस पूव प श्चम दोन कोठड्या आहेत मधे सण खुले आहे

२

३

तळमजला

२०] दुसरा वर मजला

१ पवाल दिवानखाना तिपई सांप सुरूचे सण पूर्व पश्चम सुमार १७ यासी कोठड्या आहेत तपसील
१ उत्तरेकडील दालनास मधे तेरा सण पूव पश्चम खुले आहेत बाजूस कोठड्या पूव पश्चम दोन दोन दोन लगाल्या आहेत पश्चमेकडील कोठडीत खाली उतरावयास जिना आहे पूर्वेकडील कोठडीत सेतखाना आहे
१ सदरहू दालनाचे दक्षणेस दुसरे दालन एक सण पूव पश्चम सुमार ९ मधे खुले आहेत बाजूस पूव पश्चम कोठड्या दोन आहेत
१ तिसरे दालन सदरहूचे दक्षणेस मधे खुले सण पव पश्चम सुमार ७ बाजूने कोठड्या दोन पूव पश्चम आहेत बाजूस पूर्वेकडे जिना खाली
३०] उतरावयास मदघरचे मिनास आहे

३

१ पश्चिमेकडे दिवानखाणा दुघई पुढील दिवानखाना वर लगत त्यास सुरूचे खांबाचे तीन खण दक्षण उत्तर याचे पुढे पाच खण दक्षण उत्तर येकूण दिवानखाणा १

१ पूर्वेस दिवानखाणा दुघई पुढील दिवानखाण्याचे लगत त्यास सुरूचे खांबाचे तीन खण दक्षण उत्तर पुढे पाच खण दक्षण उत्तर आहेत.

येकूण दिवानखाणा १

१ पुढील दिवानखाण्याचे दक्षणेस दुघई पूर्व पश्चिम लांबी खण सुमार १७

१ दक्षणेकडील दालनात मधे खुले खण सुमार ९ बाजूस कोठड्या दोन च्यार च्यार खणाच्या पूर्व पश्चम आहेत पूर्वेकडील कोठडीत सेतखाणा आहे [१०

१ सदरहू दालनाचे उत्तरेस दालन येक मधे खुले खण सुमार ५ बाजूस पूर्वपश्चम कोठड्या दोन दोन दोन खण्याच्या आहेत

१ दुसरे मजल्यावर तक्तपोसी करून वर कौलार आहे

---
४

दुसरा मजला

१ वाड्याचे पिछवाडीस दक्षणेकडे कौला(रु) सोपे तीन तिघई आहेत व एक सोपा अरुंद आहे यो चौक एक

१ पूर्वेकडील सोपा खण सुमार ९ दक्षण उत्तर

१ दक्षणेकडील सोपा खण सुमार १७ पूर्व पश्चम मधे पडवी पूर्वेकडील सात खणास आहे मधे तीन खणावर कौलार आहे लगत जिना माळवदावर जावयास आहे [२०

१ पश्चमेकडील सोपा दक्षण उत्तर खण सुमार ९

१ उत्तरेकडील सोपा एक दालनी अरुंद आहे

---
४

( पुढील मजकुराचे पान गहाळ. )

## लेखांक ३

श्री

याद्री सरकारातून ब्राह्मणास ऐवज घरास दिल्हा याची नाधनिसी सुरु सबा असर मया तेन व आलफ

कोंकणस्थ आपस्तंभ ब्राह्मणाची परे

१ बाळंभट भिडे रु २०००
१ निळकंठ दीक्षित बापट रु २०००
१ विठलभट दास्ये रु २०००
१ बाजीभट गोखले रु २०००
१ गणेशपंत गोखले रु २०००
१ बापूभट्ट धारपुरे रु २०००
१ मेरुशास्त्री गोडबोले रु २०००
१ लक्षुमण भट दास्ये रु २०००
१ गंगाधरपंत गोखले रु २०००
१ वासुदेवपंत गोखले रु २०००
१ बार्जी भट दास्ये रु २०००
१ मारोपंत गोखले रु २०००
१ केशवभट लिमये रु २०००
३ किता परे
 १ शिवरामपंत अभ्यंकर रु २०००
 १ रामाजीपंत भिडे रु २०००
 १ राजाराम भट गोडबोले रु २०००

३

१६

श्री

याद्री सरकारातून ब्राह्मणास ऐवज धर्मादाय दिला त्याची बाबमिति सुहूर सबा असर मया तैन व आलफ

कोकणस्त रगवेदी ब्राह्मणाची परे

१ आपाभट फाटक रु २०००
१ चिंतामणभट भाटे रु २०००
१ गोपालभट पराजपे अमडोशी २०००
१ परशरामभट केलकर रु २०००
१ बापूभट गाडगीळ रु २०००
१ सखारामभट चितळे रु २०००
१ हरजोशी पालगडकर रु २०००
१ बापूभट सहस्त्रबुद्धे रु, २०००
१ अनंतभट आठवले रु २०००
१ परशरामभट जोगळेकर रु २०००
१ शिवरामशास्त्री फडके रु २०००
१ लक्षुमणभट धामणेकर रु २०००
१ लक्षुमणपंत फडके रु २०००
१ गोविंदपंत वैद्य रु २०००
४ किता पर
 १ केशवभट परांजपे रु २०००
 १ वासुदेवशास्त्री आगाशे २०००
 १ सदाशिवपंत घडसे रु, २०००
 १ रघुनाथपंत पागेरकर २०००

४

१८

१ त्रिंबकभट चितळे

श्री

याद्री सरकारातून ब्राह्मणास परे धर्मादाय ऐवज दिला त्याची बाबमिति सुहूर सबा असर मया तैन व आलफ

देशस्त ब्राह्मणाचीं घरे

१ कृष्णभट मरकळे रु १०००
१ कोंडभट मळकरे रु १०००
१ विठलभट मळकरे रु १०००
१ गोपाळभट मळकरे रु १०००
१ नारायणभट मळकरे रु. १०००
१ हातवळणे रु. १०००
१ चाचाजी पढरपूरकर रु १०००
७

२ राज्यसनी ब्राह्मणाची घरे
१ अनतभट आग्महोत्री रु. २०००
१ मल्हा(र)राव काळे रु. २०००
२

१ राघवाच्यार्य रामानुज रु. २५००

श्री

* यादी मौजे फुलगाव येथील ब्राह्मणाचीं घरे नवीन सुरु समान असर मया तैन व आलफ शके १७३९ ईश्वरी नाम संवछरे

घरे तयार करून घरात कुटुंबसुद्धा राहातात

१ चिंतामणभट भाटे
१ गोपाळभट पराजपे
१ निळकठ दीक्षीत बापट
१ राजारामभट गोडबोले
१ वासुदेव शास्त्री आगाशे
१ बाळंभट भिडे
१ आपाभट फाटक
१ शिवरामभट आभ्यंकर
१ बाजीभट दात्ये
१ हरजोसी पालगडकर
१ परशराम भट जोगळेकर
१ आबा भट मळकरे
१ नारायणभट मळकरे

घरे मात्र तयार केलीं परंतु येथे राहात नाहीं

१ बाजीभट गोखले
१ जयवतराव गोखले
१ राघवाचार्य
३

घरे तयार करून वास्तुशांत जाली नाही सा घराजवळ छपरी घालुन राहातात

१ त्रिंबकभट चितले
१ अनतभठ आठवले
१ कोंडभट मळकरे
१ कृष्णभट मळकरे
१ गोविंदपंत वैद्य
५

---

* अशीच एक अपुर्ण यादी मिळाली आहे तीवर शके १७३९ आषाढ शा ८ भानुवासरे अशी तिथी आहे.

१ रघुनाथभट घागरेकर
१ अनंतभट पाठक आ
मिहोभी कडूसकर
१ मल्हारराव काळे सिलेदार

१६

जोर्ता माग्र तयार केली वस्ती
येथे नाहीं
१ सखोपंत पटवर्धन
१ महीभट कायगावकर
१ मिर्मभट जोगळेकर
१ विनायकभट जोगदेव
१ बाळंभट बापट
१ शिवरामभट टोकेकर
१ माहादेवभट खाडालकर

१ नरसिंहभट उकडव
१ गगाधरभट डोंगरे
१ लक्षुमणभट भामणकर

१०

घर पुरता तयार ना-
हीं परतु घराजवळ छपरी
घालून कुटुंब भ्रा राहातात
१ गगाधरपंत गोखले
१ वासुदेवपत गोखले

२

पाया माग्र भरिताल वस्ती येथें
नाहीं
१ बाळभट जोगळेकर
१ सदाशिवभट केळकर
१ गगाधरभट गाडगीळ
१ हरभट भट
१ बाळभट भिडे

५

घर पुरती तयार नाहीं व आपण येथ
नाहीं
१ नारोपत गोखल
१ लक्ष्मणपंत फडक

२

१ बाबाजी पंढरपूरकर जागा माग्र
घेऊन गेले आपण येथ नाहीं
व मुहूर्त ही नाहीं

१

घरे माग्र तयार केला परतु
मर्थ राहात नाहीं
१ सदाशिवपंत पंडरो
१ रामचद्रपंत भिडे
१ बापूभट गाडगीळ
१ बापूभट पागरकर

१ बापूभट गोखले पा-
याचा मुहूर्त करून गेले
आहेत.

१

१ परशुरामभट केळकर
१ बापूभट साठये
१ केशवभट पराजपे
१ बाळंभट दात्ये
१ भाऊ हातवळणे
१ रामभट कामतकर
१ केशवभट लिमये
१ मेरुशास्त्री
१ विठलभट मळकरे

१३ [१०

पां. न. पटवर्धन

# ६६ जेजुरी येथील शिलालेख

जेजुरी क्षेत्री खंडोबाचे देउळी पायथ्याचे वाटेपासून डाव्या उजव्या हातास दरवाजांवरून, दीपमाळांवरून अनेक लहान लहान शिलालेख आहेत बरेच शके १६५० च्या पुढील आहेत कित्येक होळकरांचे आहेत. Poona Gazetter मध्यें १३४ पृष्ठावर असा उल्लेख आहे " An inscription in the inner hall bears a date corresponding to A. D 1675 ( Shake 1597 ) and another on the inner threshold is dated [२० (Sha-ke 1303) 1381 A. D "ह्या वाक्यातील दोन्ही शक चुकलेले आहेत. पहिला लेख ( म्हणजे माझ्या यादीतील बारावा ) शके १५९७ मधील नसून शके १६९७ मधील आहे व तो Inner hall मध्यें खरा, परतु चार्दीच्या मखरावर आहे. मखर देणारे जाचकाचे वशज अद्याप आहेत दुसरा लेख (म्हणजे खाली दिलेला अकरावा ) त्याच्या प्राचीनत्वामुळें अत्यन्त महत्वाचा आहे तो हि शके १३०३ मधील नसून संवत् १३०३ मधला आहे. म्हणजे शके ११६८ ( सन १२४६ ) मधील आहे. अर्थात् ज्ञानेश्वराच्या हि पूर्वीचा आहे 'यक्षप्रतिमय* कारिता' ही शेवटची ओळ स्पष्ट लागली बाकीची अक्षरें कांही तरी दिसली तशी दिलीं

. * येथे 'म'वरील मात्रा मार्गे कान्यासारखी जोडली आहे ही प्राचीनत्वाची खूण च आहे.

३४

आहेत यावरून कोण्या रजपुताने येथला गाभारा प्रथम बांधल्याबद्दलची या बोलवा आहे तिचा यांशीं संबंध असावा अशी शंका येते लेखाची अस्सल प्रतिमा ( प्रकाशालेख्य ) येणें अगत्याचें आहे सदर लेख मुख्य गाभाऱ्याच दर वाजावर उजव्या बाजूस मध्यावर एका मूर्तीचे खालीं आहे लेखाची लांबी ८ बोटें व रुंदी ३ बोटें मूर्ति लहान असून पांढऱ्या दगडाची आहे

Gazetteer मध्ये नमूद नसलेला परंतु प्राचीनत्वामुळें महत्त्वाचा असा एक शिलालेख जेजुरीस गांवाबाहेरील प्रस्थान हेमाडपंती लवथलेश्वराला उतरतांना उजव्या हातास आहे तो माझे नजरेस आणल्याबद्दल तेथील शाळेंतील एक शिक्षक रा खेडकर यांचा मी आभारी आहे सदर लेख बराच फुटून व झिजून गेलेला आहे

१०] दगडाच्या कपऱ्या निघाल्या आहेत तरी शकसंख्या व कांहीं अक्षरें स्वच्छ लागलीं लेखाचा शक १५१० आहे अथात् लेख ३०० वर्षांहून प्राचीन आहे.

ज्या ठिकाणीं अक्षराखालीं रेघ दिली आहे, तीं अक्षरें शिलालेखांत गोवीत आहेत

१

( मुख्य वेशीनंतर मंदीपुढील दरवाजाचे डावे बाजूवरील )

श्रीमार्तंड भैरव चर

णी तत्पर आपाजी सो

पु व सी सरव पुर

नीरंतर संवत् १५६८ (?)

२

( गुळ्यांचे नवीन दीपमाळेजवळच्या ६ दीपमाळेपैकीं ५ वील )

२०] श्री मार्तंडचरणी
तत्पर कृष्णाजी
\+ \+ त निरंतर
सन ( ? ) १७८०

३

( हेगडे प्रधान यांचे देवळाजवळील वाटेवरील )

श्री कमळोजी कदम रावराम( ? )ज रघुजी कदम
राव पाटील कोरेगाव वडमाव स्थान दि-
क्षाण गोविंद गणेश कृत सेवा दरव
जा श्री मार्तंड भैरव चरणारविंदी संपूर्ण
३०] मस्तु शुभ भवतु ॥ छ ॥ तरफ सांडस प्रा
त पुण सान्निध्यवती भीमातीर ॥ छ ॥

॥ शके १६६४ दुदुभि संवत्सरे श्री
मार्तंड चरणी तत्पर गणेशसुत
गोविंद कुलकर्णि आंगोटेकर

४

( या पूर्वेल दरवाजावर उजवे बाजूस )
श्री मार्तंडनाहि मनाजी प
त खंडोजीपत व त्रीबकपंत आ
फंलकर शके १६७९ ई
श्वर नाम संवत्छरे वैशा
ख शुद्ध त्रीतिया गु [१०
रुवार शुभ भवतु ॥

५

( या पूर्वेल दरवाजावर डव्ये बाजूला )
श्री
श्री शके १६८० बहुध
न्य नाम संवत्छर श्रावण
सुध १ श्री मार्तंड चरणी त
त्पर प(ा) ळाजी +
+

६ [२०

( प्राकाराच्या आत शिरल्याबरोबर डाव्या हातास खांबावर )
श्री मार्तंडचरणी तत्पर
मल्हारजीसुत तुको
जी होळकर नीरंतर स
के १६९२ वीकृती नाम
सवछरे श्रवण सुधि
प्रतीपदा सोमवार का
रखाना कीताब तळम
लफात शामजी ना
रायेण राजापुरक [३०
र परगणे दीजिरि

७

( शेजारी डाव्या कोपऱ्यात )

श्री मार्त भैरवचा भक्त मारवज

जीमे भ श्रु दीपोवाळी व दोन्ही दा

ळ मंडप व दोन्ही दीपमाळा व

दरवाजे वेउल्ळ व दोन्ही वीहीरी

८

( होळकराच्या चौघड्याचे दारावरील )

श्री शाके १६७८ धाता

१०] नाम संवछर श्री मा

र्तंड भैरयचरणी

खडोजीसुत मल्हा

रजी होळकर णीरतर*

९

( मणिमल्लाच्या डाव्या हातात कोटाचे एका खांबावर )

श्री शाके १६८० ब

हु धान्य नाम स

वत्सरे कार्तीक शु

ध पंचमी मातडभर

२०] णी श्रीधकराव सीवदेव

१०

मुख्य देवळाला जाताना देवडीवरील उजव्या बाजूच्या खांबावर ८ ओळींचा धासळून गेलेला उरलला नाही

११

( मुख्य गाभाऱ्याचे दरवाणावर उजव्या बाजूस यक्षमूर्तीचे पायथ्यास )

स १२०३ क्षर्दो श्री' र्भ मायाचे ॥

(ग० वीर पाल वीर मह सातत जा

यउ न्नू के म स्वाक्ष था स क पा दे

यक्ष प्रति ामर्य कारिता

---

* ' त 'ला मोडीतला र खाली जोडला आहे.

## १२

( गाभाऱ्यांतील मखरावर जें चांदीचे कवच आहे त्याचे मध्यावर )

श्री मार्तंडचरणी तत्पर
रखमाजि जाचक निरंतर
सके १६९७ श्रावण शुध ७ ॥

## १३

( देवळांत खंडोबाच्या व म्हाळसेच्या पितळेच्या मूर्ति आहेत त्यावर व त्यां
प्रभावळीवर असलेला हा श्लोक रा. बाबूराव बेलसरे यांचे तोंडून उतरून घेतला.

मालोजी भोसल्याचे उदरजलनिधि शाहशीतांशु झाल
तद्गर्भि येकराजा तनयवर तिघे त्यास दीपांबिकेला [१
शाहक्ष्मापः शरीफा वनिपसुगुण तुकोजिभूपार्कवंशी
खंडेराया स्वदेवाशरभनृपवरें अर्पिलें जेजुरीसी

## १४

( पंचलिंगाचे देवळांत शिरताना उजव्या बाजूस )

श्री शके १६७७ युवा ना
म सवछरे श्री
पंच ल्लीगचरणी वठिल
शिवदेव सासवड
कर हा (१) ना

## १५ [२

( म्हाळसेची शिळा आहे तेथें बाहेरील खांबावर )

श्री शके १६६४ दुदु
भी नाम सवत्सरे
श्री मार्तंडभैरव
चरणी खंडोजी सु
त मल्हारजी होळकर

## १६

( भांडारगृहाच्या दरवाज्यावरील खांबावर )

श्री मार्तंड प्रसन
सके १६७८ धाता [३

---

१ 'हा' स 'र' मोडीतल्याप्रमाणें खाली जोडला आहे.

नाम सवछरे चैत्र सु
घ प्रतिपदा भाशाम्रर
पैकी दुआजी चेवधरी
श्री गादेकर याच्य घा ?
कर सु मवतु ॥

१७

( दोन घंटापैकीं एकावर )

1711

N S DASANGUST

१०]

१८

( दुसऱ्या घंटेवरील गोलाकार लिहिलेला )

श्री मार्तंड स्वाम जेजुरी भक्तराज
धाल्हाजी व हारीवा बीन आनजी
माळा गा
१ बगारोबा

१९

( उत्तराचयाच्या रस्त्यावरील मध्यावर दरवाजाचे उजव्या बाजूस )

श्री सके १७०५ क्रोधी
सवछरे ते दिवसी श्री मार्तंड भै
रवचेरनि तत्य हायेसत
राव सुत खंडोजी अण्णा
गीरवीकर नीरंतर

२०]

२०

( श्री लक्ष्मयकेश्वराचे दारावरील शिलालेख )

जळाशय कता श्री
माजि धर्माजी काट
कार्यकर्ता हेगोजि का
ट परो [ प ] कारार्थ
धर्म धंधे का० ८

२१

(लवथळेश्वराला जातांना पायऱ्याच्या उजव्या बाजूस ७ओळींचा, बरीच अक्षरें फुटलेलीं)

श्रीगणेशायन
मा: श्री स्व (?) स्ती सके १५३०
सो म श्व (?) छ ा श्री (?) म॥ वाध
रावीवार (?) कामळावळि ×-|× धा+
धी क मी
ठी पा (× ० ॥ ∞
+ + का

२२ [१०

( तुकोजी होळकर यानी मल्हारराव होळकर यांचे मादिर बांधलें आहे त्याचे दरवाजावरील )

श्रीसके १७१२ साधारणनाम
सवछरे आस्वीन शुध दशमी
श्री मल्हारगौतमेस्वरचरणी
मल्हारजी सुत तुकोजी होळकर

दत्तो वामन पोतदार

---

## ६७ जयाद्रिमाहात्म्य

जेजुरीचें माहात्म्य वर्णन केलेली सदर पोथी पेशव्यांचें घरी आहे सबंध गांवात एक च प्रत आहे. पोथीच्या अंतावरून ती प्रत अर्वाचीन दिसते. आसपा [२० सच्या स्थानांना हि संस्कृत नावें दिली असून क्षेत्राचे माहात्म्य शिवपांडवसंवादांत वर्णिलें आहे. पोंथीचा अतिमोल्लेख असा:—इति श्रीमत्पद्मपुराणे पाताळखडे जेजुरीमाहात्म्ये शिवपाडवसवादे श्रवणफळनिरूपणो नाममष्टादशाध्याय: ॥ १८ ॥ श्री मार्तंडभैरवार्पणमस्तु ह्माळसाकांत प्रसन्नोस्तु इद पुस्तक श्री ह्माळसाकांतदास दामोदरसुत गोवींदेन लीखीते ॥ यार्द्रासि पुस्तक द्रिष्टवा तार्द्रिशि लीखीतं मया ॥ यदिशुध्यमशुद्ध वा मम दोष न वीद्यते शके १७६२ अश्वान कृष्ण ५

नमुन्या करतां खालील श्लोक देतो:—"श्रीमार्तंड भैरव उवाच ॥ श्रृणु नारद वक्ष्यामि श्रवणस्य फलं पुनः ॥ सप्त स्थानेषु सप्तैव माहात्म्यानि च सति च ॥१४॥ तेषां जयाद्रिमाहात्म्य प्रथम समुदीरित॥ द्वितीयप्रेमर प्रोक्त [ पाली–पेंबर] क्षे (त्र)

माहात्म्यमुत्तमं ॥ १५ ॥ अनयोरगैव्हा प्रोक्ता नान्येषामत्र कारणं ॥ आद्यो जयाद्रि माहात्म्य चद्रास्मानं तु मध्यत ॥ १६ ॥ प्रेमरत्नेप्रमाहात्म्यं तृतीयं तु ततः पठेत् । सर्वपापविशुद्धात्मा ममसानिध्यता व्रजेत् ॥ १७ ॥

दत्तो वामन पोतदार

## ६८ तीन देवदास

समर्थांची कविता खंड १ पृ ४११ वर समर्थांची निरनिराळीं नावें दिलीं आहेत त्यात ' देवदास ' हें हि एक नाव आढळलें या नावावर असलेले दोन अभंग हि सदर पुस्तकात पृ २८१ ( अ २०९ ) व पृ ३०० ( अ २८१ ) वर आढळतात व्यंकटेशादि स्तोत्रनिर्माता देवदास हा तर निराळा ठरला च, आता १०]दादेगावकर देवदास व देवदास नामधारी समर्थ हा मात्र एक नवीन च भेद डोळें पहात आहे परंतु समर्थकालीन पत्रव्यवहारादि सामुग्री लवकर च बाहेर पडेल त्यावेळीं याची चचा करण्यास साधन उपलब्ध होईल

दत्तो वामन पोतदार

## ६९ अठरा टोपकर

अठरा टोपकर असें शब्द पुष्कळ ऐकण्यांत येतात त्याची यादी हि प्रसिद्ध असावी असें वाटतें पण मला यथाप ती कोठें न आढळल्यामुळें एका बाडांत खालील टांचण आढळलें तें चर्चेकरितां मंडळास सादर करीत आहे ' पत्रदोर ' वगैरे शब्दांची मूळ रूपें मला सापडलीं मार्गीन कंसांतील प्रतिशब्द मला सुचले तसे दिले आहेत बाकी उतारा जशाचा तसा दिला आहे बाड तळेगांव दाभाडे २०] येथील माळमारं यांचेकडे मिळालें

श्री

पाश्चात् प्रभेद् टोपिया १८

| | |
|---|---|
| १ फिरंगी ( Portugal ) | १ इंग्रेज ( England ) |
| १ वलंदेज ( Holland ) | १ फरासीस ( France ) |
| १ सुवेस ( Swiss ) | १ कसतत्यान (Satlaudian ? Celtic ?) |
| १ निविरायान (Norwajian ?) | १ विनेज ( Venetians ) |

| | |
|---|---|
| १ यम्रदोर | १ दिनमार्क ( Denmerk ) |
| १ मेंग ( Greek ) | १ उरुस ( Irish ? ) Russian |
| १ रसतार | १ रुमियान ( Roman ) |
| १ लातियान ( Latian ) | १ तालियान ( Italian ) |
| १ यहुदीन ( Jew ) | १ प्रेमरयान ( Pomeranians ) |
| ९ | ९ |

सख्या १८

दत्तो वामन पोतदार

## ७० ' ड ' कार व ' छ ' कार

आपल्या मंडळाच्या शके १८३४ चा वृत्तांत इ. स. रा. राजवाडे[१० यानी पृष्ठ १५० वर 'वाग्भटकृत अष्टाग सग्रह सहिता'या मथळ्याचा एक लेख प्रसिद्ध केलेला आहे. सदरची सहिता त्यांचे सग्रहीं आहे व मी ती पाहिली आहे अक्षर-दृष्ट्या व आयनमनदृष्ट्या रा. राजवाडे म्हणतात, त्याप्रमाणें ही सहिता खरोखर विचारणीय आहे व त्यांच्या शकेस थोडीशी पुष्टी च पाहिजे असल्यास या लेखानें थोडीशी होईल. परतु पृष्ठ १५३ वर एक सस्कृत श्लोक दिलेला आहे तो पहातां त्याच्या शेवटच्या चरणावरून लेखकाच्या दृष्टीनें तरी वाग्भट हा ' बोधिसत्व ' होता, असें दिसतें. तो चरण हाः—

। स वाग्भटो नदतु बोधिसत्वः ॥

तेव्हा कदाचित् ' नमो शर्व्वाय ' हें लेखकाचें असावें असो.

या च संहितेच्या आरमी कांही चिन्हें दिली आहेत, ती चिन्हें कशाची आहेत[२० अशाबद्दल येथील कांही मित्रांनी विचारल्यावरून ही अडवणूक इतराची हि असूं शकेल म्हणून त्यांचा माझ्या दृष्टीने काय अर्थ आहे तो देतोंः—

हीं चिन्हें एकंदर पांच आहेत. त्यांत प्रथम ' ए ' असें प्रथमचें चिन्ह, या दोन रेघा आहेत, दुसरें चिन्ह अडव्या रेघेस अडकविलेला ' ड ' कार आहे शक ६९७ मधील राष्ट्रकूटांचा जो ताम्रपट प्रभातांत छापला आहे त्यांत ह्या ' ड 'ची आकृति सापडते तिसरें चिन्ह ' शून्या'चे आहे. चोथें चिन्ह पुन्हां दोन रेघा आहेत व पांचवें चिन्ह ॐकार आहे. म्हणजे त्या सर्व चिन्हांचें सद्यःकालीन रूपातर असें होईलः-

यापैकीं दोन ठिकाणच्या दोन दोन उभ्या रेघा वाक्यारंभ व वाक्यांत दर्शक आहेत हें सांगण्याची जरूर नाहीं पूर्वकालीन बहुतेक मोडी पत्रांवर 'ब' कार अथवा 'छ' कार काढण्याची पद्धत असे त्यांपैकीं 'ब' कार हा 'शिव' दर्शक आहे व 'छ' कार हा 'शुद्धसत्व' दर्शक आहे येथें 'ब' कार हा 'शिव' दर्शक आहे

आतां शून्याबद्दल माझें मत असें आहे कीं तें 'छ' कार दर्शक आहे मज जवळ श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें घरचें जुनें योगवासिष्ठ आहे. त्याचे पहिले अध्या याचे शेवटीं ॥ छ ॥ ॥ ॰ ॥ असें लिहिलें आहे ॥ छ ॥ असें एकाहून अधिक वेळ ग्रंथांतीं लिहिणेचा प्रघात आहे. परंतु ॥ ॰ ॥ हें शून्य लिहिलेलें मला या योगवासि

१०] ष्ठाचे पोथीवर व प्रथम पहाण्यास सांपडलें तेव्हां ॥ ० ॥ हें शून्य ॥ छ ॥ छकाराबद्दल च असावें असें दिसतें

तेव्हां 'अष्टांग संग्रह संहिता' या ग्रंथांत प्रथमचीं अक्षरें अगर चिन्हें दिलीं आहेत तीं 'शिवार्थे व मांगल्यार्थे' आहेत

गो का चांदोरकर

---

## ७१ शक १५२२ तील एका कुणब्याचें हस्ताक्षर

१ रत्नागिरी जिल्ह्यांत राजापूर तालुक्यांत कशेळी येथील कुलकर्ण्यांच्या दफ्त रांत हा कागद सांपडला मंजिन्याच्या हजरतखानाची स्वारी शक १५२१ त राजापूर प्रांतें झाली त्या वेळीं या कुणब्याचा कबिला हजरतखानानें दस्त करून नेला तो सोडविण्यास कुणबी राजापुरास गेला व राजापुरचा मोकदम रुद्राजी

२०] हरिदेव शेणवी यास जमान देऊन कुणब्यानें आपला कबिला सोडून घेतला तत्संबंधीं हा कागद आहे त्याच्या शेवटीं कुणब्यानें स्वहस्तानें सही केलेली आहे या सहीवरून एवढें सिद्ध होतें कीं, शक १५२२ त कोंकणांतील एका खेड्यांतील एका कुणब्याला लिहितां वाचतां येत होतें त्यावरून असें हि अनुमान निघतें कीं, यःकश्चित् कुणबी जर शक १५२२ त लिहू वाचू शकला तर तत्कालीन जातीनें त्याहून सर्वथा उच्च जे मराठे व महारी हे हि बहुशः लिहिणारे वाचणारे त्यांचे त्यांपैकीं हि कांहीं कनिष्ट लोक निरक्षर असतील परंतु कांहींना लिहितां वाचतां येत असण्याचा बराच संभव होता हें उघड आहे

२ ह्या पत्राचा दुसरा एक उपयोग आहे त्या काळीं जंजिऱ्याचा शिद्दी कोंकणांतील बंदरकिनाऱ्यावरील गावांवर हल्ले करून माणसे दस्त करून बंदीत घालीत असे. खडो महाळ चिटणीस व बाळाजी विश्वनाथ भट यांच्यासारख्या वरिष्ठ जातीच्या लोकांना हि शिद्याचा हा उपसर्ग होत असे. मग इतर गरीबाचा काय पाड!

३ अस्सल पत्र मंडळाच्या सभासदांच्या अवलोकनार्थ मंडळाचे दफ्तरी आहे त्याची नक्कल येणेप्रमाणे:—

द्दा वो अता पाडाव कुणबी व गणा गोठणकर कुणबी मौजे कसेली ता राजापूर सुहुर सन इहिदे मया अलफ कारणे राजश्री रुद्राजी हीरदेव सेणवी मो मजकुरी गोसावियासी लिहून दिला कतबा ऐसा जे हजरत खानसाहेबाची आरमाराची स्वारी राजापूर प्राते जाहाली ते समई आपला कबिला दस्त करून राजापुरीस [१० आणिला माणसे २

| कमली अवरत | राम मूल |
|---|---|
| खासा अता पाडाव | अता पाडाव |
| १ | १ |

यास तुह्मांस जमान देऊन खंड करार केला रुपये

ऐन खड २००
भाते १०

———

२१०

एकुण दोन से दाहा रुपये मुदत तीन महिनेयाने झाडा करून देऊन या खेरीज खर्चास घेतले रुपये १० दाहा सवाई प्रमाणे खडाचा पैके बराबरी देउन सदरहू [२० खेरीज जमानत लोक सर्ते प्रमाण देऊन मुदतीस दिले नाही तरी दर सदे

दर माहे व्याज प्रमाणे देऊन

छ १७ रमजान हा कतबा सही

निशानी

अंता पाडावा

४ हा कागद प्रारंभा पासून निशानी ह्या शब्दा सुद्धा कोण्या तरी कारकुनानें लिहिला, कुणब्याला लिहिता येत असेल किंवा नसेल या शकेने कारकुनानें निशानी हा शब्द लिहिला—हेतु असा की, नांगर, खुरपें, विळा, वगैरेची निशानी कुणब्याचा जी असेल ती आपण पुढें करावी इतक्यांत असे कळलें की, कुणब्याला स्वतः लिहिता येतें. तेव्हां अर्थात् च त्याची सही त्याच्या हातानें कागदावर करून घेतली .[३०

यावरून निष्कर्ष असा एक निघतो कीं, मायः कनिष्ठ जातीचे लोक मांगर, धुरें, अशी आपली निशाणी ऊर्फ खूण करीत परंतु दुसरा हि एक निष्कर्ष निघतो तो असा कीं, सहीला हि निशाणी ही च संज्ञा आहे व असे निशाणी सही अशी असों असलीं म्हणजे साक्षर माणसाशीं गांठ आहे असा अर्थ होत असतो प्रस्तुत कागदांत सही निशाणी असे शब्द आहेत तेव्हां हा लिहिणारा कुळंबी होता हें कागद लिहिणाऱ्या कारकुनाला माहीत होतें, हें स्पष्ट आहे

वि का राजवाडे

---

## ७२ हरिराज शेंडे कृत मुद्गलार्येचें श्लोकबद्ध भाषान्तरद्वय

— •—

१०] १ हरिराज शेंडे, मुद्गलकर, यानीं मुद्गलभट्टकृत रामार्येचीं दोन निरनिराळीं मराठी भाषान्तरें मला सांपडली आहेत एक पन्हाळ्यांत कारंजे येथें मिळालें; व दुसरें कोंकणांत राजापूर तालुक्यांत देवाच्या गोठण्या नजीकच्या धालवली गांवीं राहणाऱ्या रा रा वासुदेवराव गोखले यांच्या येथे मिळालें कारंजे एथें मिळालेलें भाषान्तर कच्चें व अपरिपक्व असून कवीनें बालपणीं प्रथम च केलें असावेंसें दिसतें धालवलीस मिळालेलें भाषान्तर पक्कें व सुरेख असून, कवीनें तें प्रौढ वयांत रचिलें असावें धालवली येथील प्रतींत रामार्येवर कार्कभट्ट नांवाच्या कोण्या शास्त्र्यानें संस्कृत टीका हि दिलेली आहे धालवली प्रतीचे आद्यन्त असे:—

आदि

' श्रीगणेशाय नम ॥ सीतालतासमासक्तं रामं कल्पमहीरुहं ॥ सान्द्र[१]
२०] शितलछायं भ्रांतविश्रांतिदं भजे ॥१॥ श्रीमन्मुद्गलभट्टेन रामचंद्रप्रमोः कृता॥ आर्यावृतेस्तुति स्तस्या व्याख्यानं क्रियते स्फुटं ॥ २ ॥

अंत

" हरिः ॐ । इति श्रीविद्वन्मुकुटमहाशुद्गलभट्टविरचितं रामार्याशतं अष्टाधिकं सपूर्ण ॥ ॥ शुभमस्तु ॥

राघवमेघोऽमोघो विद्युत्पीतांबरमवरः ॥
जीवनदाता सविता हृदयाकाशे सदा ममोल्लसतु ॥ १ ॥
श्रीधनुर्बाणधरं धारं दशाननविमर्दनं ॥
प्रफुल्लनयनांभोजं भजे दशरथात्मजं ॥ २ ॥

---

१ स द्रा

पदार्थद्योतनी चेयं दीपिकार्यानुकूलिनी ॥
काकंभट्टैः सुविधृतां स्वसुखाप्त्यै मुदा स्फुटं ॥ ३ ॥
मार्गशीर्षे सितेऽष्टम्यां सौम्ये थ विकृतौ शुभा ॥
सिद्धेयं दीपिकार्याणां मुदं वहतु सर्वदा ॥ ४ ॥

इति श्रीमहामुद्गलभट्टविरचितश्रीरामार्यास्तवपदार्थदीपिका संपूर्णा ॥ ७ ॥

समुद्रवसनावर्तिविद्वन्मंडलमूर्तिना ॥
आर्या विरचिता श्रीमन्महामुद्गलसूरिणा ॥ १ ॥

गोदातीरीं विराजे विमल बहुवरें मुद्गल श्रेष्ट नावें ॥
पावे सत्पुत्रसौख्या जननिकर जया सेवितां येकभावे ॥
शेंडे तेथील जोशी विबुध बहुभले वेदविद्याविचारें [१०
त्या वंशीं कश्यपाचा मुकुटमणि दिसे माणिकेशावतारें ॥ १ ॥

सत्पुत्र त्याचा हरिराज नामें
करि रविध्यानविधान नेमें ॥
करूनि आर्याश्रम अर्थ त्यानें
समर्पिला रामपदीं सुखानें ॥ २ ॥
माता मृता शिशुपणीं पण वाढवीलें
सद्बुद्धि देउनि मला मग सिद्ध केलें ॥
तो माणिकेश्वर पिता नमिला मनानें
भवे करूनि हरिराजकवीश्वरानें ॥ ३ ॥

इतिश्रीमन्महामुद्गलभट्टाचार्यसूरिणा विरचिता रामार्या श्रीमज्जानकी-[२०
रमणचरणपरिचरणशीलाः सार्थाः संस्कृतप्राकृतार्थेन समाप्ता ॥ ७ ॥ ॥

२ कारजे एथील पोथींत शेंडे बद्दल शेटे असा पाठ आहे. परंतु शेंडे हा च पाठ खरा असावा. शेटे हें आडनांव ब्राह्मणांत आढळत नाहीं. शेंडे हें आडनांव ब्राह्मणांत आहे. गांवाच्या शेंवटी जें मुळी रहात असत ते शेंडे. कोंकणांत शेंडे चितळे, शेंडे सोमण अशी आडनावें आहेत शेंडे चितळे म्हणजे गावाच्या शेवटास रहाणारे चितळे त्याप्रमाणें च शेडे जोशी म्हणजे गांवाच्या शेवटास रहाणारे जोशी.

३ मुद्गलभट्ट कोण कोठील तें माहीत नाहीं. हा महाराष्ट्र ब्राह्मण होता, यांत संशय नाहीं. मुद्गलरामायण ज्या मुद्गलानें केले तो च जर हा असेल, तर हा

१ र्णां २ स्या ३ भा

शिवाजी व संभाजी यांच्या कारकीर्दीत झाला असावा काकंभट्टानें पद्‌धंद्योतिनी टीका विकृति संवत्सराच्या मार्गशीर्ष शुक्ल किंवा कृष्ण अष्टमी बुधवारीं संपविली सौम्ये असा पाठ धरून शक १६३२,१६९२ किंवा १७५२ ह्या तीन सालांत मार्गशीर्ष शुक्ल किंवा कृष्ण अष्टमीस बुधवार पडत नाहीं -तेव्हां पाठ सोमे असा धरावा तो धरल्यास शक १६९२ च्या मार्गशीर्ष कृष्ण अष्टमीस सोमवारे पडतो तात्पर्य काकंभट्टाचा टीकाकर्तृत्वकाळ शक १६९२ धरावा परंतु हरिराम केव्हां झाला, हें कळण्यास ग्रंथांत कांहीं एक गमक नाहीं मात्रा अगदीं अलिकडील आहे कदाचित् हरिराम हा काकंभट्टाचा समकालीन असेल दोन्ही मात्रान्तरें मंडळाचे समहीं आहेत

१०] वि का राजवाडे

---

## ७३ गोत्र ऊर्फ कुलनाम ऊर्फ आडनांव

परवां सिन्नरास मला एक बेपारी साक्षर लाडवंजारी भेटला त्याच्या बोलण्यांत कुलनाम ऊर्फ आडनांव या शब्दाविषयीं गोत्र हा शब्द वारंवार आला म्हणजे ज्याला आपण आडनांव किंवा कुलनाम म्हणतो त्याला तो गोत्र म्हणे अपत्य प्रभति गोत्र, ह्या पाणिनीय सूत्राला अनुसरून तो बोलल्यासारखा दिसला ह्याचा अर्थ असा नव्हे कीं त्याला पाणिनीयसूत्र माहीत होतें अर्थ इतका च कीं त्याच्या जातींत पाणिनीनें नमूद केलेला संप्रदाय पूर्वापार प्रचलित होता हा संप्रदाय म्हणजे गोत्रनामाला कुलनाम समजण्याचा प्रघात भारतवर्षांत फार प्राचीन आहे हर्ष चरितावर व्याख्या करणारा शंकर ह्या प्रघाताचा उपयोग करतो उदाहरणार्थः

२०] । अनार्यः पुष्यमित्रः मौर्यं बृहद्रथ पिपेष

( हर्षचरितं—षष्ठ उच्छ्वास )

यावर शंकर अशी व्याख्या करतो—

। मौर्य इति गोत्रनाम ।

तात्पर्य, गोत्रनाम म्हणजे कुलनाम ऊर्फ आडनांव

वि का राजवाडे

---

## ७४ दासींचीं नांवें संस्कृतांतून मराठी

हर्षचरिताच्या अष्टमोच्छ्वासांत बाणानें दासीची नावें ( पृष्ठें २४६, २४७) दिलीं आहेत. त्यांवरून मराठींत खालील नावें आली आहेत.

१ कलहंसि = हंशे ( एकशेष )
२ सुंदरि = सुंदरे
३ मंगलिके = मंगळे
४ शबरिके = सबरे, सवरे, शबरे
५ मातंगिके = मंगे
६ वत्सिके = वच्छे
७ नागरिके = नागरे
८ विराजिके = बिर्जे
९ भृंगारधारिणि = भुंगे
१० केतकि = कैके
११ मेनके = मेनके
१२ विजये = बिजे
१३ नर्मदे = नर्मदे, नबु
१४ सुभद्रे = सुभद्रे
१५ वसतिके = वसन्त्ये
१६ मुक्तिके = मुक्त्ये
१७ मंजुलिके = मंजुळे
१८ कालिंदि = कालिंदे
१९ कमलिनि = कमळे
२० रोहिणि = रुई
२१ अंब = अंबे
२२ अंबिके = अंबिके
२३ सीमंतिनि = शेवते

ही सर्व नावें शूद्रांत महाराष्ट्रांत सध्या हरहमेष आढळतात.

वि. का. राजवाडे

[१०

## ७५ विमानें व त्यांचा प्राचीन संस्कृत ग्रंथांत उल्लेख

१ विमानांचा उल्लेख भारतादि इतिहास व पुराणे यांतून सडकून आढळतो. ग्रीक पुराणांतल्याप्रमाणे च भारतीय इतिहासपुराणांत विमानातून देवादि प्रवास करताना दिसतात. परतु, हे उल्लेख पौराणिक अतएव कविकल्पित आहेत, अशी शंका सहज च येते कालिदासादींच्या काव्यांतून देवानी पुष्पवृष्टी केल्याची वर्णनें सर्वश्रुत आहेत, परंतु, ती हि काल्पनिक च होत, वास्तविक नव्हत लक्ष्यार्थ किंवा व्यंग्यार्थ सोडून वाच्यार्थानें भौतिक पदार्थांनी बनविलेल्या विमानाचा उल्लेख इतिहासाला बहुत उपयोगाचा होतो. पंचतंत्रहितोपदेशादि नीतिकथांत विमानांचा किंवा जादूच्या गरुडाचा उल्लेख येतो. तो हि काल्पनिक च दिसतो, वास्तविक म्हणवत नाही म्हणजे

[२०

कोणी मनुष्य गरुडावर बसून राजकन्येच्या महालांत शिरून गेला, ही गोष्ट वास्त विकांत काल्पनिक मानल्याखेरीज उडत्या सतरंज्या, घोडे वगैरे सारखा व हा उडता मायावी गरुड होता, असें म्हणावें लागतें. तात्पर्य वर्तमान काळीं ज्या तऱ्हेच्या यानांना विमान म्हणून समजण्यांत येतें व ज्यांत यांत्रिक गुणाहून इतर कोणतें हि मांत्रिक गुण नसतें, त्या तऱ्हेच्या विमानांचा उल्लेख प्रायः इतिहासांतून, पुराणांतून व काव्यांतून आढळत नाहीं. परंतु ह्या विधानाला मला एक अपवाद आढळला. बाण आपल्या हर्षचरिताच्या सहाव्या उच्छ्वासांत खालील वाक्य लिहितो:—

"आश्चर्यकुतूहली च चंडीपतिः द्रोणोपनतयवननिर्मितेन नभस्तलयायिना यंत्रयानेन अनीयत क्वापि" ।

१ ] चंडीपति नांवाच्या राजाला ऊर्फ संस्थानिकाला कोण्या यवनानें आकाशांतून जाणाऱ्या यंत्रयानानें ऊर्फ विमानानें कोठें तरी नेलें, असें बाण लिहितो. एथें एवढें लक्ष्यांत ठेवावयाचें आहे कीं बाण प्रस्तुत प्रकरणांत ऐतिहासिक काळांत अनेक राजे कसकसे विपत्ति पावले तें सांगत आहे. पौराणिक किंवा काल्पनिक राजाचा उल्लेख बाण एथें करीत नाहीं. त्याच्या पूर्वीच्या हजार पांचशें वर्षांतील राजांचा निर्देश बाण करीत आहे. ह्या उल्लिखित राजांपैकीं कित्येकांचा पत्ता लागलेला आहे व कित्येकांचा लागावयाचा आहे. परंतु, एवढें निश्चित आहे कीं ह्या राजांपैकीं प्रत्येक व्यक्ति ऐतिहासिक आहे. प्रत्येकाचा अंत कसा झाला, तें बाणाच्या काळीं सर्वत्र मशहूर होतें. म्हणजे बाणाच्या काळीं तत्पूर्वीचा हजार पांचशें वर्षांचा इतिहास लोकांना माहीत होता असें झालें. ह्या ऐतिहासिक संस्थानिकांपैकीं चंडी

२०]पति हा एक संस्थानिक होता. त्याला एका यवनानें विमानांत बसवून आकाशांतून कोणीकडे नेऊन टाकिलें तें कोणाला बाणाच्या काळापर्यंत माहीत नव्हतें. आश्चर्यानें व कुतूहलानें प्रेरित झाल्यामुळे चंडीपति यवननिर्मित विमानांत बसला व विपत्ति पावला, ही गोष्ट मात्र सर्वतोमुखीं झाली व तिची जागृत स्मृति बाणाच्या काळा पर्यंत होती. सांगण्याचा मुद्दा एवढा च कीं आकाशयानाचा हा बाणकृत उल्लेख पौराणिक किंवा काल्पनिक नसून, केवळ वस्तुस्थितिदर्शक, अतएव विश्वास्य आहे. ह्याच्या खरेपणाचा संशय घेण्याला कांहीं एक कारण दिसत नाहीं.

२ बाण शक ५२२ च्या सुमारास झाला. तत्पूर्वी केव्हां तरी हजार पांचशें वर्षांच्या आंत चंडीपति झाला असावा. चंडीपतीचा नक्की काल सांगतां येत नाहीं. तथापि अदमासानें तो शकाच्या दोनशाच्या वर्षाच्या अगोदर व शकपूर्व एकशेच्या नंतर

३०] कधीं तरी झाला असावा. ह्या तीनशें वर्षांत पंजाबाच्या आसपास यवनांची म्हणजे ग्रीकोद्भव लोकांची हालचाल चालू असे. तेव्हां प्रश्न असा उद्भवतो कीं त्या काळीं किंवा केव्हां हि यवनांत म्हणजे ग्रीक लोकांत विमानांचा शोध लागला

होता की काय व आकाशमार्गानें गमन करण्याजोगें विमानकलेचें ज्ञान त्यांच्यांत त्या काली होतें की काय! एकदोन मान्य एन्सायक्लोपीडिया ऊर्फ विश्वकोश पहाता असें दिसतें कीं विमानयन्त्राचा शोध ग्रीक लोकांस त्या काली लागला नव्हता. आता बाण तर स्पष्ट म्हणतो की यवनाने राजाला विमानांतून कोणीकडे नेलें न कळे. तेव्हा ह्या परस्पर विरोधी विधानांची एकवाक्यता कशी लावावयाची? किंवा ती लागत नसल्यास ह्या दोन विरोधी वचनातून कोणतें विश्वास्य मानावयाचें? एकदरीत साधकबाधक प्रमाणें पाहता, माझें असें निश्चित मत झालें आहे की बाणाचे विधान पूर्णपणें विश्वासपात्र आहे व त्यावरून अशी निष्पत्ति होते की त्या काली यवनलोकांत म्हणजे एशिआटिक ग्रीक लोकांत विमानकला, कोणत्या तरी प्रकारची, प्रचलित होती. जड हवेंत विमान दोन तऱ्हांनी [१० तरंगविता येते. सामान्य हवा उष्णतेनें हलकी करून विमानाच्या फुग्यात भरून तें हवेहून हलकें करावयाचें, किंवा हवेहून एखादा हलका वायु फुग्यात भरून तें कार्य साधावयाचें. पैकी दोन्ही तऱ्हा तत्कालीन यवनांना माहीत असण्याचा संभव आहे. त्यातल्या त्यात ऊष्णतेने हवा हलकी करून फुग्यात भरण्याची तऱ्हा सहज उपलभ्य असते व फ्रान्सात सवाशे वर्षांपूर्वी मॉंड-गोल्फिए यानें या च तऱ्हेचा उपयोग केला होता. इतकें खरें की यूरोपियन शोधकाना यवनाना ही विमानकला माहीत होती की नव्हती एतत्संबंधी साधनें जशी व जितकीं उपलब्ध व्हावीत तशी व तितकी झालेली नसल्यामुळें त्यानी ग्रीकाना म्हणजे यवनाना ही कला माहीत नव्हती असा नकारात्मक निश्चय केला. परंतु, बाणाच्या ह्या निश्चीत व विश्वसनीय विधानानें हा नकारात्मक निश्चय बदलणें प्राप्त आहे. बाणाच्या विधा-[२० नानें असें म्हणावें लागतें कीं बाणपूर्वकालीन यवनाना कोणत्या तरी प्रकारची विमान कला निःसंशय माहीत होती. विशिष्ट प्रकार कोणता होता, तें कळण्यास संस्कृत ग्रंथात सध्या तरी कोणतें च साधन मला उपलब्ध नाही.

वि. का. राजवाडे

## ७६ अजे, अजी

मराठींत म्हताऱ्या, स्त्रीस संबोधिताना विशेष सलगी असल्यास अजे अशी हाका मारतात व बहुमानानें अजी अशी हाका मारतात. ही हाक मराठी ने सहज च संस्कृतांतून वंशपरंपरेनें घेतली आहे बाण हर्षचरितांत अष्टमोच्छ्वासांत स्त्रियाना संबोधण्याचे दहा पांच प्रकार अर्था सुद्धां देतो. त्यात खालील वाक्य आहे:—

तुव्हशिची रोप पंढरिच्या वर्तावेनें । लापण केली रुकमिणीच्या कर्तायान ॥ १४ ॥
राहिरुकमिणु गुज बोलति सिडक्यादारी । पाकल्या तुव्हसिनें प्रीत नेली सारी ॥१५ ॥
रुसली रुकमिण जेविना दूद पेड । इट्ठल देव म्हणि तुला जमीचा भिंद पड ॥ १६ ॥
सुरतिच मोसा रुकमायांच्या नतिमदि । इट्ठल देव उभा जवीरी पेठमदि ॥ १७ ॥
*शिरिया सोनियाच रुकमायाइच कांकण । देवा इट्ठलानं पडवे ठेविल राकाण ॥१८॥*
शिरिया सोनियाच रुकमायाइच कापड़ुच । इट्ठल मोति भेजा सार जवारी साल उभ ॥ १९ ॥
साकरच लाडु रुप्याच्या परातित । घ्यानुषा तुकारामु साडु मुक्याल किर्तनातु ॥ २० ॥
नवास करिति पुण्याच्या पार्वतीला । घ्यानुषा तुकारामु साडु थोराच्या संग [१०]तीला ॥ २१ ॥
देव इट्ठल कथा करी गाव सोडून एकीकड । सिरापर्नीला दुद-पेड ॥ २२ ॥

## ४ आठवडा ( गीत )

आइतवारु गेला सोमवारु आला । बेलदवना मह्मदेवाला ॥ १ ॥
सोमवारु गेला मंगळवारु आला । आंया कवड्याची माळ तुला ॥ २ ॥
मंगळवारु गेला बुधवारु आला । किस्न गोकुळीं जलमला ॥ ३ ॥
बुधवारु गेला बेस्तरवारु आला । पार्गी साकार गडपीला ॥ ४ ॥
बेस्तरवारु गेला सुक्रिवारु आला । चोळी पाताळ रुपीमीला ॥ ५ ॥
सुक्रिवारु गेला सनवारु आला । देवा मारुतीला रुइगीची माळ घाला ॥ ६ ॥
सनवारु गेला आइतवारु आला । देवा जोतिबाला नवरत्नाची माळ घाला ॥ ७ ॥
[२०]आईतवारु गेला आठवडा गाईला । इट्टू पंढरी राहिला ॥ ८ ॥

## ५ नारायणरावाचा मृत्यु

नारायण मारिविला डासकन्या माच्या । रोज(द)ना करियाचा वागरचा निरया पोट्या ॥ १ ॥
नारायण मारिविला दासकन्या भिंती । रोज(द)ना करिताति तेच्या अवारीच हत्ती ॥ २ ॥
नारायण मारिविला पुण्या शेराच्या सावलीला । जासुदाच्या जोड्या गेल्या पुण्याच्या पावलीला ॥ ३ ॥
नारायण मारिविला टाकिला सदकातु । पुलनी जविर्ता दुरभनु ॥ ४ ॥
नारायण मारिविला गेचा दिल्लीला वातम्या । ससा मारिला पुतण्या ॥ ५ ॥

---

१ आपानें=स्वाइ २ नवचानें ३ भेदभाव, भीति ४ जवाहिराच्या ५ जवाहिरे

नारायण मारियिला हंबारत्या गाई । चुलत्या राजसाला कणाव आली नाही ॥६ ॥
नारायण मारियिला पुण्या शेराच्या कोटामंदी । चुलत्या राजसाच्या डोई घालितु पोटामदि ॥ ७ ॥
गोपिकाबाई म्हणी पुण्या शेराला काय करु । फौजा राहिल्या दिल्लीवरु ॥ ८ ॥
गोपिकाबाई म्हणी पुण्या शेराची झाली माती । नारायण बाळ दिल गारडयाच्या हाती ॥ ९ ॥
नारायण मारिला दुइ दरवजाच्या मदि । वैन्या मनसुबा केला कदी ॥ १० ॥
नारायण मारिला पुण्या शेराच झाल जोतं । गोपिकाबाई म्हणी बाळ वाणीचं माझ होत ॥ ११ ॥
नारायण मारिला पुण्या शेराची गेली कळा । वाण्या उद्म्यान दुकानं केली [१० गोळा ॥ १२ ॥
पुण्या शेरामंदि फुल साडिली जाइची । सती मिरावली सून गोपिकाबाईची ॥ १३ ॥

## ६ कोल्हापुरच्या चिमाजीमहाराजांविषयीं गीत*

चंदनाचा पाटु किकन्यानं कोरिला । राजा मोहित्यानी मारिला ॥ १ ॥
कोलापूर शार चौक्या बैसल्या ठायी ठायी । चिमाजी महाराजाच्या कोण आडव झालं नाही ॥ २ ॥
कोलापूर शारु रकाळ्या बारा येशी । चिमाजी महाराजाचा मेणा न्हेला इसवासी ॥ ३ ॥
रकाळ्या तळ्यामाइ मासा करितु पाणी पाणी । बावाजी महाराजानं भाचा राजाला केला धनी ॥ ४ ॥
माळ्याच्या मळ्यामंदि मेतिबाईला तिन पान । चिमाजी महाराजान कस कटिल [२० हिंदुस्तान ॥ ५ ॥
जिरसाळीच्या ताढुळाला लिव नारळिच रसु । चिमाजी महाराजाला कसा घडळा परदेसु ॥ ६ ॥
कोलापूर शारु टाकी झडति हजाइरु । झाला मंडई बाजाइरु ॥ ७ ॥
बावड गाविच्या माळावरी वाज बिगुल नवानवा । चिमाजी म्हाराजाला फसगमतीन न्हेला कवा ॥ ८ ॥
कोलापूर शारामदि गस्त फिरती आरबाची । नगरी शिवाजी महाराजाची ॥ ९ ॥
कोलापूर शारामदि वाज लोवंदं खुळखुळ्याची । हवा बघावी रकाळ्याची ॥ १० ॥
सुरतिच मोती राजाच्या तुरयाला । हुजरी पारिचाला ॥ ११ ॥

---

१ नवसाचं. * हा चिमाजी कोणता ? २ दगड घडण्याचे हत्यार. ३ हजारों. ४ घंटा ५ तुऱ्याला. ६ पहारा करण्यास.

राजाच्या दरबारीं कोण पसाऱ्यां पदुकीचा । नवा हुजऱ्या माहाराजाचा ॥ १२ ॥
राजाच्या दरबारीं कोणी वाकुनि मुजरा केला । भिकबाळीचा तोल गेला ॥ १३ ॥
राजाच्या दरबारी हुजरी मटल्याती । गेंद हुळपाची झुन्झ्यानी ॥ १४ ॥
कोलापूर शारु मोसन साइसुद । मदि मळाच पाणी उड ॥ १५ ॥
कोलापूर शारु कुणी बांदिल सरजानं । अंबारीचा हत्ती गेला गंगच्या दरवाजान ॥१६॥
कोलापूर शारु दुरन दिसतु फोंदा माळु । आंबायाइच्या देवळाला देताची वांदृवळु ॥१७॥
इसतीस पाइरी आंबायाइच्या मळाइला । सोनिगाची कठी दिलीं गवळ्याच्या पाळ्याला ॥१८॥
कोलापूर शाह गलोगलीन सरजातच । रकाळ तळ्यामदिं सोन्याचा सव्यामच ॥१९॥
१०] चिमा महाराज शाव झाल मण रडती आइबाइ । राजा गेलेला आला माघीं ॥२०॥
बाबा महाराज शावे झाला अंपगेपच्या माळावरी । आंगीन तेला दिली वच गंगच्या तासांवरी ॥ २१ ॥
बाबा महाराज शावे झाल येवती गावच्या धनामंदि । सैनें सोडिल बनामदिं ॥२२॥

## ७ कृष्णाचें गाणें

चंद्रावळीसाठी किस्ण मतुरी झाला चाटा । परोपरीचा दिडलुगी मतुरेच्या बाजारातु
किस्ण देवाच शेरपग । पिवळ्या हॅडयासाठीं चंद्रावळीच दुकाचाम ॥ २ ॥
मतुरेच्या बाजारातु लोणी इकत राजुइकु । सातीं गवळणी मु चंद्रावळी भाजुइकु ॥ ३ ॥
चंद्रावळीसाठीं किस्ण झाला डोंबारी । पेळु रवुनि सेळ दिलाचा भेदुरी ॥ ४ ॥
२०] हिरवा पेरवाचा पिवळा सेचा बाणु । चंद्रावळीसाठीं किस्ण झालाचा भागवानु ॥५॥
करनाटच्या गोविंदु रासमिदीला उभा रडानु । चंद्रावळीचा भेद घेतु ॥ ६ ॥
, " " उभा राडी । चद्रावळीचा भेदु पाडी ॥ ७ ॥
करनाटच्या गोविंदु राईच्या पड पाचा । चंद्रावळीच्या महाला जाया सव धिनगार मागी लिपी ॥ ८ ॥

## मलहारी देवाचें गाणें

काकला कोकरु बाणु जातिचा मटइतु । देवा महारानि संडा लाविला पेन्तुइ ॥१॥
देव मलारी म्हणइतु काग म्हाळसा राग राग । गळो म्हनी शिकारीला बाणु लागुनि आली माग ॥ २ ॥

---

१ पसाऱ्या (!) २ शब-प्रेत ३ पाडिण ४ अमि ५ पाम्रावर ६ सैन्य ७ मथुरेत ८ दुकाम ९ मथुरेत १० सेण्यास-सेण्याकरितां

देव मल्हारी म्हणइत् काग म्हाळसा रागामदि । गेलो व्हतो शिकारीला बाणु धावली बागमदि ॥ ३ ॥
क्षाकला कोकरी बाणु जानी मेंढवाड्या । देव मल्हारी गावड्या ॥ ४ ॥
बाणाई धनगरणीच्या ताकामदि लेंड्या। मल्हारी देव तिच्या राकितो शेळ्या मेंढ्या॥५॥
तारळ्याबाईला देव मल्हारी मासे मारी । म्हाळसाबाई म्हणी लिंगायताची आम्ही नारी ॥ ६ ॥
बाणु म्हाळसाच्या दोघांच्या जाती । मल्हारी देवासाठी बसल्या एका ताटी ॥ ७ ॥
धनगराची बाणुबाई वाण्याची दोन म्हाळइसा । घास गिळितु तिला कसा ॥ ८ ॥

## ९ संकीर्ण गीतें

[१०

तांबड्या मदिलाची बांदणी येनाची। बाळराजाची माज्या दिष्ट काढिती हाताची ॥ १ ॥
आवयेळीचाँ पावणा न्हव वराणभाकरीचा । पाड पुसिती साकरचा ॥ २ ॥
पानखातावणा आलाया माज्या गावा । तांबुळ्याची पेट दावा ॥ ३ ॥
पेठ गाव सारिख नाही येवढ्या जवारीत । पाणी खेळतु शिवारातु ॥ ४ ॥
पेट गावीला भोवतनं मळदळ । पंचक्रोशीत पाणी शिवारात खेळ* ॥ ५ ॥
काय करावा मयावाचूनि भेतरपणा ? ईना रुचु मिठावाचुनि पकवान्ना ॥ ६ ॥
परसुदांच्या येळा नारु म्हणति देवा देवा । नाडबध्या गेला गावा ॥ ७ ॥
,, ,, नारु झालीया घाबरी । नाडबध्याची नगरी ॥ ८ ॥
बाळातिणीबाई तुझी पिवळी झाली गाते । सायास केल माते ॥ ९ ॥
,, तुझी येळालवगाची शेगयेडी । आत दरवाळती तुज्या कर्ताची शाल जोडी ॥ १० ॥

[२०

बाळातिणीबाई वाऱ्याउमर तुजा वाडा। आत दरवाळतो येळालवंगाचा सुटवडा॥ ११॥
बाळातिण झाली मावलीच्या घरी । एक महिना झाला बसु दिना परवरी ॥ १२ ॥
बाळातिणीबाई पिवळ्या तुज्या टाचा । दिष्ट होईल न्हाणी जाता ॥ १३ ॥
हाती दवत लेकणी जातो वाटनं लिवितु । सुचदाराला बोवितु ॥ १४ ॥

---

१ मेढवाडा, २ धनगर, ३ नदीचें नाव ४ मासे ५ अवेळीचा. ६ खाणारा
* पेठ गावच्या गतकालीन स्थितीचा हा उल्लेख अक्षरशः खरा आहे, सध्या मात्र त्याची स्मृति करून देण्याइतकी च स्थिति आहे पाणी कमी होत गेल्यामुळे मळेदळे हि कमी होत आले आहेत व चालले आहेत. ७ प्रसूतीच्या ८ प्रसूति कष्टमय झाल्यास ब्रह्मचाऱ्याच्या पायाचे तीर्थ दिलें म्हणजे सुलभप्रसूति होते अशी समजूत आहे त्यास अनुसरून हा उल्लेख आहे. ९ गात्र. ६ आईनें. १० नवऱ्याची. ११ सोप्यावर.

५३

मर्दांच्यो धोतराची चालितु कानपट्टी । झुमदारांच्या जातो भेटी ॥ १५ ॥
जुरक्याच्या गाड्या बैल मदन म्होर लाचा । तेडा पेवाचा जागा ठाचा ॥ १६ ॥
जुंदळ्याचा गाडा रुसळा माळाला । घुरी रेग्ना चाळ्याला ॥ १७ ॥
जुंदळ्याचा गाडा येतो माळानं घुमइतु । धनी बैलाची उमेदु ॥ १८ ॥
माझ्या परंटी रास पाडिचली दाणियाची । दिष्ट काढिती बैलासगट धनियाची ॥१९॥
जुंदळ जोगदाक माजा पवार गादीयेळी । धनी येल रांचइला ॥ २० ॥
शेति झाला रासु सडोच्या गोण्या किती । माचळ माच शेर्मी ॥ २१ ॥
" " " तिचड्या चसचिली । पासोडी नेसविली ॥ २२ ॥
" , , तिचड्याला चोण । राशीच झाल सोन ॥ २३ ॥
१०] " " " तिचडा चिरामण । रास मेमीत सराचण ॥ २४ ॥
हरिचदरचारा मर्दुर्नी येतो येरा । उमा चाचडीवरी हिरा ॥ २५ ॥
शेती झाली रासु चला आली कुंडे । पाट शेलियानं पसु ॥ २६ ॥
काय मी सांगू सइ माझ्या चाळाजीचे गुणु । शेल्याच्या पदरानं लोटी बैलाची गचाणु ॥ २७ ॥
बैलामदि बैलु मदन समरतुं । येतो चाडचाला इवरतु ॥२८॥
येलाच नाच गरडचकरयो । धनी बैलाचा इचर्यो ॥
दुरून चळकिती गुज्या चइलाची जोडी । तइया गाडीला मागमोडी ॥३०॥
पेलाची नाच येडु चिंतामणी झाइ मटचा तेचा धनी ॥३१॥
दुरून चळकिती गुल टोपाच्या माज्या चाली । येतु काचयाच्या झोकाखाली ॥३२॥
२०] शेरमर सोन तालेवाराच्या सोप्या लोळ । चाळ चिंदल्याच सेळ ॥३३॥
सुखामाखा माऊपणा माऊपण्याची मीन माळी । इडी सोकली डाम्पा मुठी ॥३४॥
मारीनं केला संगु राचा कचेरिचा नासा । गोविंदइड्याला छचगायाइचा चडाटा फासा ॥३५॥
चकुर चंदनु सार्णेयाइटा हर्नु । गोन्यापणाला मगरेतुं ॥३६॥

---

१ रेशीमकाठी २ उमेदवार ३ पडवीवर-सोप्यात ४ गच भरला ५ उचला ६ मुडपाच्या मध्यमार्गी रोचलेला खांब ७ नैवेद्य ८ मळलेला पण चाळ विण्यापूर्वीचे खळ्यामोवती पडलेला धान्यसंग्रह ९ वाजविण्याचे यंत्र १० कण साची कूस ११ गचाण १२ समर्थ १३ गरूडाच्या १४ हौशा १५ सहाणेला १६ पासलो १७ चंदन चासला म्हणजे चाळा-गोरा-होतो त्यास अनुलक्षून हा उल्लेख आहे

चंदन म्हणितु साग तुझ म्या काय केल । तुज्या संगतीनं माझ अरद अंग गेल ॥३७॥
चदन म्हणितु साणबाई उच्या जाती । तिच्या संगतीन देहाची झाली माती ॥३८॥
चकुट चदनाच डोंगरी तेच गोतं । साणकारण गावा येतु ॥३९॥
चकुट चदन साणबाइन सारिला । शाणा शब्द देगिला ॥४०॥
पहाटच्या पान्यामदि दळिति रागराग । सासु जळति घरामाग ॥४१॥
भणीभावडाची पोटामदि माया । पिकल सिताफळ आत साकराचे छाया ॥४२॥
लेकुरवाळीची बुटी उघडी भाकरीची । वाझ नारीच्या परवरी गोणी पडली साकरची ॥४३॥
सगी दोपारीची आऊत सुटली माळाइची । सुरत कोमली बाळाइची ॥४४॥
वळवाचा पाऊस आला शिवार झोडियितु । बाळ कुळव सोडियितु ॥४५॥ [२०
भरल्या बाजारातु वळकिती गोतावळा । बयासारखा तोंडावळा ॥४६॥
भरल्या बाजारातु सोड गोविंदा माझा हातु । माज्या माहेरिच गवळी आल्याति बाजारातु ॥४७॥
बधुजी लावी चुडा भावज गुजर गेली आतु । सोड मेराळा माझा हातु होइल दोघाची कलागतु ॥४८॥
बयाच्या घरा गेली बया नाही घराइतु । भावज गुजर म्हणिइति कोण पावणी दाराइतु ॥४९॥
मायबापाच्या माघारी भाऊ नव्हत बहिणीच । भावज गुजर म्हणियिती कोण गाव त्या पावणीच ॥५०॥

वा. दा. मुंडले. [२०

---

# ९४ बाजीरावसाहेब पेशवे यांच्या कुटुंबाची शेवटची हकीकत

१ बाळाजी विश्वनाथापासून बाजीराव रघुनाथापर्यंतचा म्हणजे शक १६०० पासून शक १७३९ पर्यंतचा पेशव्याच्या कुटुबाचा इतिहास बराच त्रोटक मशहूर आहे. परंतु शक १७३९ पासून शक १८३५ पर्यंतची त्या घराण्याची हकीकत अद्यापपर्यंत कोणी लिहिलेली नाही. सबब शक १७३९ त बिठूरला बाजीरावसाहेबांनी वास्तव्य केल्यापासून शक १८३५ पर्यंतच्या ९६ वर्षांतील त्या घराण्याची अगदी संक्षिप्त हकीकत येथें देतों.

---

१ हलक्या २ गोत. ३ कासार.

२ बाजीरावसाहेब बिठूरला निघाले त्या वेळीं त्यांची एक बायको-बाई येथील फाळके राजस्यांची मुलगी-रायगडास होती शक १७४० त इंग्रजांनीं त्या किल्ल्यास मोर्चे लावून त्या बाइस खालीं उतरविलें, व तिची रवानगी ब्रह्मावर्तास तिच्या भावाकडे करून दिली याच वेळच्याच एका टेंकडीवरून रायगडावर तोफांची मारगिरी करितांना, शिवाजीमहाराजांचा राजवाडा व आंतील दफ्तरखाना खाक जळून गेला त्यांत शिवकालीन सर्व कागदपत्र 'अग्नय स्वाहा' झाले, त्यामुळें शिव कालीन इतिहासाची फार हानि झालेली आहे

३ ब्रह्मावर्तास जाण्यापूर्वी बाजीरावसाहेबांस वाराणसीबाइच्या पोटीं वामन राव नांवाचा मुलगा झाला होता, परंतु तो महिना पंधरा दिवसांतच निवर्तला
१ ]दुसरी बायको सरस्वतीबाई इला हि एक मुलगी झाली होती, ती हि अशी च वारली

४ बिठूरला गेल्यावर अभ्यंकर यांच्या घराण्यांतील सत्यभामाबाइ, दणदणे चितळे यांच्या घराण्यांतील एक ( नांव माहीत नाहीं ), पावली येथील आठव ल्यांच्या घराण्यांतील गंगाबाई गोखल्यांच्या घराण्यांतील मैनासाहेब व रिसबुडांच्या घराण्यांतील सईबाइ अशा पांच बायका बाजीरावानें केल्या पैकीं, आठवल्यांच्या गंगाबाइला तीन मुली झाल्या त्यांतील एक जन्मल्यानंतर सहा दिवसांनीं च निवर्तल्यामुळें बाकींच्या दोन मुलींविषयीं च सांगत आपणास लिहावयाचें आहे ह्या दोघींचीं माहेरचीं नांवें अनुक्रमें योगाबाइसाहेब व कुसुमाबाइसाहेब हीं होत या उभयतांपि ] वडील मुलींचें-योगाबाइसाहेबांचें-जन्म सुमारें शक १७३७ त झाल, व धाकट्या मुलीचें-कुसुमाबाईसाहेबांचें-शक १७६८ च्या पौष शुद्ध १५ स झालें
२०]कुसुमाबाईसाहेबांस बयाबाइसाहेब म्हणतात ह्यांपैकीं योगाबाईसाहेबांचें लग्न श्री बाबासाहेब कुरुंदवाडकर यांशीं श्री नानासाहेब पेशवे यांनीं शके १७७७।१७७८ चे सुमारास लावून दिल्यानंतर चव दोन वर्षांचे आंत श्री सौ योगाबाइसाहेब ऊर्फ सरस्वतीबाइसाहेब पटवर्धन ह्या ब्रह्मावर्तासच निवर्तल्या त्या दक्षिणेंस आल्याच नाहींत श्री कुसुमाबाइसाहेब ऊर्फ बयाबाइसाहेब, लष्करचे बाबासाहेब आपटे यांचे चिरंजीव रावसाहेब यांस दिल्या यांचें सासरचें नांव सरस्वतीबाइसाहेब हेंच होय ह्या सध्या काशीस आपल्या स्वतःच्या वाड्यांत राहतात, व ह्यांना इंदूर व ग्वाल्हेर येथील संस्थानिकांकडून अल्पशी मैनास चालू आहे इंग्रजांकडून मात्र अद्याप एक कपर्दिक हि मिळत नाहीं ह्या बाईचें वय आजमितीस ६६ वर्षांचें आहे आज पेशव्यांच्या कुळांतला औरस संतति म्हटला म्हणजे ह्या एकट्या होत ह्यांच्यापुढें पेशव्यांचें
१०]कोणी औरस राहिलें नाहीं या बाईचे दर्शनाचा यदा व आम्हांस योग आला बाई निस्पृह, धैर्यशाली व अभिजात असून भटांच्या घराण्यांतील मुत्सद्येपणाचें तेज त्यांच्या चेहऱ्यांत दिसते

५. ब्रह्मावर्तास असतांना, पुत्रसतति होण्याची निराशा वाटून, बाजीरावसाहेबानी धोंडोपत नानासाहेब, दादासाहेब व बाळासाहेब असे तीन मुलगे एकामागून एक दत्तक घेतले हेतु हा की, एक दत्तक वारल्यास पूर्वजास पाणी देण्यास कोणा तरी रहावा. पुण्याजवळील बोरघाटाखाली थोरले वेणगाव म्हणून एक खेडे आहे, तेथे भट या उपनावाचे कुटुंब रहात असे तें पेशव्याचे सगोत्र होते, दूरातले देखील नव्हते. त्या घराण्यातील हे त्रिवर्ग होत. नानासाहेब, दादासाहेब व बाळासाहेब यांची पूर्वीची नावे अनुक्रमें धोंडोपत, सदाशिवराव व गगाधरराव अशी होतीं श्री धोंडोपतनाना यांची एकदर तीन लग्नें जाहली पहिली मुलगी करमरकराची, दुसरी पाटणकराची, व तिसरी सागली येथील गोंजुमामा करमरकराची. अशी ही श्रीमत नानासाहेबाची तीन कुटुंबे असून पहिल्या दोघींचें नाव सारजाबाई असें होतें, व [१० तिसरीचें नाव कृष्णाबाई असें होतें दादासाहेबास काशीच्या कार्लेकर घराण्यातील मुलगी केली हिचें नाव रोहिणीबाईसाहेब बापू गोडबोले याची मुलगी काशीबाई बाळासाहेबास केली

६. वरील त्रिवर्गापैकी मधील दादासाहेब हे लवकरच मरण पावले नतर त्याची बायको रोहिणीबाईसाहेब यानी रावसाहेब नावाचा मुलगा दत्तक घेतला ह्याचे पूर्वीचें नाव पाडुरगपंत असून, त्याचा जन्म हि वेणगावच्या भट घराण्यात च झाला अर्थात् श्री. रावसाहेब हे बाजीरावसाहेबाचे नातू होत रावसाहेब याचें लग्न ओकाच्या घराण्यातील रमाबाईसाहेब नावाच्या मुलीशी झाले मागें सांगितल्याप्रमाणे नानासाहेब, दादासाहेब, बाळासाहेब व रावसाहेब हे भट घराण्यातील होते इतकें च नव्हे, तर ह्या चवघांपैकी नानासाहेब व बाळासाहेब हे सख्खे बधू असून, त्याचे [२० वडिलाचें नाव माधवराव असें होतें. दादासाहेब व रावसाहेब हे चुलत बधू असून, ह्या उभयताचें नानासाहेब व बाळासाहेब याशी तें च नाते होतें. हे चवघे हि जवळजवळ समवयस्क असून, त्याचा काळ घोड्यावर रपेट करणें, दाडपट्टा खेळणें इत्यादि मर्दुमकीच्या खेळात जात असे प्रसिद्ध सेनानी तात्या टोपे हे ह्याचे सवगडी होत श्री नानासाहेब तर घोड्यावर बसण्यात तरबेज असून, तत्कालीन अश्व परीक्षकामध्यें व त्याचप्रमाणें घोड्यावर बसणारामध्यें अग्रेसरत्वाचा मान त्याजकडेसच येतो रावसाहेब हि काही कमी नव्हते.

७ असो बाजीरावसाहेब शक १७७२ पौष शु. १२ स वारले त्या वर्षाच्या ज्ञानप्रकाशच्या अंकात ह्या निधनाची हकीगत तीनचार ओळीत दिली आहे।

८. ब्रह्मावर्तास बाजीरावसाहेबाच्या आश्रयास रामचद्र नारायण भिडे, तात्या [३० टोपे, पुण्यातील कवठीच्या अड्ड्याजवळील पटवर्धन, मोरो बाबूराव फडणीस, गिसबूड, आठवले वगैरे बरी च मडळी होती. शिवाय तांबे, देवधर, पराडकर, देव वगैरे

आश्रित, कारकून व वैदिक हि बरे च होते. ब्रह्मावर्त एखाद्या लहानशा संस्थानिकाच्या राजधानीसारखें भासे, व स्वतः बाजीरावसाहेब राजैश्वर्यानें रहात. स्नान संध्या, जेवणखाण, यज्ञयाग, धर्म-उद्यापनें, मंत्र-घोष व जुगारी ऐषआराम, अशा सुखवस्तु स्थितीत बाजीरावानें ब्रह्मावर्तास तेहतीस वर्षे काळ लोटला. बाजीराव शरीरानें धष्टपुष्ट. कांतीनें उंच व चेहऱ्यानें उमदा दिसे. ७५ वर्षांचें वय असतां त्यावेळची बाजीरावसाहेबांची तसबीर आमचे समक्ष आहे. तींत वयाच्या मानानें चेहऱ्यावर उमदेपणा जास्त दिसतो. या गृहस्थाचा चेहरा उतार वयापर्यंत बाळसेदार व तरुण दिसे, असें लोक सांगतात. एकंदरींत पुरुष निष्काळजी व बालिशसा. स्वशरीरसंरक्षण एवढीच या गृहस्थाची काळजी. आपल्या दुसरी जबाबदारी ह्यानें ओळखिली नाहीं व ओळखण्याचें ह्याच्या अंगांत सामर्थ्य हि नव्हतें. साम्राज्य, तत्संबंधक राष्ट्राच्या पुढाऱ्यावरील जबाबदारी, प्रजेचें ऋण, वगैरेंची जाणीव या पुरुषाला भासली च नाहीं.

९. बाजीरावसाहेबांच्या निधनोत्तर त्यांचें आठ लाखांचें पेन्शन आपल्याला मिळावें, म्हणून धोंडोपंत नानासाहेब यांनीं फार खटपट केली. परंतु ती कारकीर्द डलहौसीची असल्यामुळें नानासाहेबांना वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या. या अन्यायाचा संताप घेऊन, दिल्लीचे पातशाहा, अयोध्येंतील तालुकदार, लक्ष्मीबाईसाहेब झांशीवाल्या, बरेलीचा नबाब व हिंदुमुसलमान पलटणी यांच्या साहाय्यानें नानासाहेबांनीं पेन्शन नाहीं तर राज्य मिळविण्याचा प्रयत्न केला, तो सर्वविश्रुत च आहे. ह्या प्रयत्नाला उत्तर हिंदुस्थानांत 'नाना-गर्दी' म्हणून म्हणतात. ती शक १७७९ [ चैत्रांत सुरू झाली. पुढील चार महिन्यांत मिरत, दिल्ली, कानपूर, बरेली व लखनौ या प्रांतांत अतिशय गर्दी उसळली. सर्वत्र कापाकापी सुरू झाली. नानासाहेबांच्या हातून सर्व सूत्रें गेलीं, व बाजारबुणग्यांचा सर्वत्र सुळसुळाट माजला. शेवटीं, आपापसांत कानपूर सोडून नाना परिवारासह अयोध्येच्या प्रांतांत गेले. ह्या च वर्षी नानांची व तात्या टोपे यांची शेवटची भेट झाली. नाना उत्तरेकडे गेले व तात्या टोपे पश्चिमेकडे गेले. तात्या टोपे हे माणिकराजांकडील फितुरामुळे पकडले गेले. तात्या *टोप्यांचा अंत शक १७८१ चैत्र वद्य १ स झाला.

* तात्या टोपेसंबंधानें ता० १७।३।१९ चे 'टाइम्स'मध्यें काहीं माहिती प्रसिद्ध झाली आहे. मध्यहिंदुस्थानांत पडौण नांवाचें संस्थान आहे. त्या संस्थानच्या मुक्त्या च राज्य कठ लागलेल्या लग्न राजाच्या पणजोबाजवळ तात्या टोपे राहिले होते. सर ग्रिफ मीड यांजकडे त्यानें बातमी दिली, व अशा रीतिनें तात्या टोपे पकडले गेले. त्याबद्दल पडौणचे राजांना १००० रुपयांचें वर्षासन इंग्रजांनीं करून दिलें, व तें अद्याप चालू आहे.

१०. नाना सपरिवार उत्तरेस जे गेले ते अनेक अडचणी व हालअपेष्टा खात कसेबसे नेपाळात शिरले त्या वेळी त्याच्याबरोबर त्याच्या मातुःश्री सईबाई-साहेब व मैनाबाईसाहेब, त्यांचें स्वतःचे कुटुंब, बाळासाहेब व त्यांचें कुटुंब आणि रावसाहेब वगैरे मंडळी होती. ही सर्व मंडळी एक वर्षपर्यंत कधी नेपाळहद्दीत तर कधी इंग्रजहद्दीत लपत छपत होती. त्या काली नेपाळांत जंगबहादुराचा अमल होता नेपाळच्या हद्दीत शिरलें व जंगबहादुरला ती बातमी लागली की त्याच्या प्रांतातून बाहेर जावें लागे. बाहेर जावयाचें म्हणजे इंग्रजहद्दीत. तेथें निभाव लागे-नासा झाला – व तो आठपधरा दिवसांतच लागेनासा होई– म्हणजे पुनः नेपाळे-श्वराच्या हद्दीत शिरणें कपाळी येई. असे गोते खात खात शक १७८० चा भाद्रपद मास आला, म्हणजे १७७९ च्या आषाढापासून १७८० च्या भाद्रपदापर्यंत चौदा [१०
महिने ही मंडळी वनवास करीत होती. ह्याचा मुक्काम नेपाळ–हद्दीत पाचसात कोसांच्या आंतबाहेर होई व तो हि जंगलांत किंवा जंगली खेड्यात होई. शेवटी शक १७८० च्या भाद्रपदात नेपाळहद्दीत ठाडा म्हणून एक गांव आहे, त्याच्या-पासून सात कोसावर देवखरी या स्थली स्वारीचा मुक्काम पडला. तेथे दगदगीनें हलक होऊन नानासाहेब यास दोषी ज्वर लागला व त्यात च त्याचा अंत भाद्रपद वद्य १४ बुधवारी झाला नानासाहेब अत्यवस्थ पडले तेव्हां त्याच्यानें हालचाल होईना आणि नेपाळकराच्या प्रांतिक व ग्रामिक अधिकाऱ्यांचें तर आपल्या प्रांतातून निघून जाण्याचें टुमणें लागलें. तेव्हां, मंडळीने स्वारीच्या दोन तुकड्या केल्या. स्त्रियादि परिवाराची एक तुकडी करून ती ठाडा येथें पाठविली व स्वतः नानासाहेब पांचचार शेलक्या लोकांसह देवखरीच्या रानांत एका ओढ्याच्या लगत्यास राहिले [२०
तेथें त्याचा अंत व दहनविधि झाला. नंतर अस्थि गोळा करून त्या च दिवशी बरो-बरची मंडळी ठाड्यास येऊन परिवारास मिळाली ठाडा येथे बारावा व तेरावा करून, नंतर हा स्त्रियादि परिवार तेथे च कांही दिवस राहिला. ह्या स्वारीत श्रीमंत गंगा-भागीरथी मातुःश्री बयाबाईसाहेब आपटे ह्या होत्या. नानासाहेबाची उत्तरक्रिया त्याच्या देखत ठाड्यास झाली, हें सांगावयास नको च त्या काली कुसुमाबाईसाहेब आपटे ह्याचे वय १२ वर्षांचें होतें. त्याना सर्व गोष्टी यथास्थित कळत होत्या, व त्यानी च मेहेरनजर करून आम्हास ही हृदयद्रावक हकीकत इत्थंभूत मित्तीसुद्धां निवेदन केली.

११. तात्पर्य, नानासाहेब यांचा अंत दोषी ज्वरानें नेपाळहद्दींत देवखरी येथें शक १७८० भाद्रपद वद्य १४ बुधवारी म्हणजे इ स. १८५८ च्या ६ आक्टो- [३०
बरास झाला हें निश्चित आहे नानासाहेब काश्मिरांत गेले, रशियांत गेले, त्यांना इंग्लंडांत पिंजऱ्यात घालून कोंडून ठेविलें, वगैरे हकीकती ज्या अधूनमधून अद्याप हि स्वसंतोषार्थ कित्येक उपद्व्यापी लोक नाताळच्या सुमारास प्रसिद्ध करीत अस-

मात त्यांत कांहीं तथ्य नाहीं हे उघड आहे तसेंच, नानासाहेब म्हणून कित्येक निरपराधी लोकांस जो मूर्दंड १८५९ नंतर वीस पंचवीस वर्षे पडला तो हि माफक होय ह्यांत संशय नाहीं तत्कालीन इतर एकदोन गृहस्थांनीं हि ही च हकीकत अनुवादिली

१२ नानासाहेब भाद्रपदांत देवघरी येथें वारले त्यापूर्वी तीन महिने ज्येष्ठ वद्य अमावास्येस बाळासाहेब दोघी ज्वरानें व नेपाळांत ठाग येथें निधान पावले

१३ ह्या चौथ्या महिन्याच्या पाळाला प्रारंभ होऊन दोनचार महिने होत आहेत नाहींत तों रावसाहेब पेशवे यांच्या डोक्यांत काय स्फूर्ति आली न कळे, ते त्याराला सोडून इंग्रजी हद्दींत ग्वालेरीकडे गेले त्यांचें कुटुंब रमाबाईसाहेब इंग्रजी
१०]हद्दींत होत्या रावसाहेब सिपालकोटनजीक असतांना त्यांच्या मुक्कामाची बातमी जवळच्या इंग्रजी ठाण्यास त्यांच्या एका मराठे जातीच्या आश्रितानें चिठुरी करून दिल्यामुळें, ते थोड्याच दिवसांत धरले गेले, व त्यांना देहान्त-दंड *झाला त्यांच्या साधा हि भयंकर अंत झाला असें ऐकिवांत आहे। कोणत्या प्रकारें झाला तें माहीत नाहीं

१४ बाळासाहेब, नानासाहेब रावसाहेब व त्यांच्या पत्नी ही चार माणसें निवर्तल्यावर बाकी बाजीरावसाहेबांच्या स्त्रिया मैनाबाईसाहेब व सईबाईसाहेब, बाळासाहेबांची स्त्री काशीबाई, नानासाहेबांची स्त्री कृष्णाबाई, व बाजीरावसाहेबांची मुलगी कुसुमाबाई ह्या साधा स्त्रिया मात्र राहिल्या नानासाहेबांच्या मृत्यूनंतर, त्यांना नेपाळसरकारापासून फारसा त्रास पोंचला नाहीं इतकेंच नव्हे तर नेपा
२०]ळांत राहण्याला हि त्या सरकारानें ह्या थोर व कुलीन स्त्रियांना आडकाठी केली नाहीं ह्या बायांच्या बरोबर तात्या टोपे यांचा मुलगा पांडुरंगराव याचे चार मुलगे होते शिवाय सांबे वगैरे कारकून व आश्रित असून राव राजेसर दिनकरराव राजवाडे यांचे साडू दामोदरपंत पटवर्धन हे हि होते बळवंतराव गाय हे ह्या पांच हि बायांना मातृवत् मानीत व यावज्जन्म त्यांच्या सेवेंत यांनीं आपला देह सार्थिला नानासाहेबांच्या मृत्यूनंतर कांहीं कालानें ही सर्व मंडळी खाटमांडूस गेली तेथें बायांच्या जवळ जें जडजवाहीर होतें तें मोडून त्यांनीं तेथें थापाथळींत एक जागा विकत घेतली व त्यावर राहण्यास वाडा बांधिला योगभमाथ तीनचार लक्ष रुपये खर्चून तीनचार जहागिरी गांव खरेदी केले आणि त्यांच्यांतून येणाऱ्या पांच-सात हजार रुपयांच्या उत्पन्नावर गुजराण चालविली ब्रिटिश हद्दीपासून पांचचार
३०]मैलांच्या आंत 'राणीगंज' म्हणून एक नेपाळांत आपल्या जहागिरींत नवं गांव वसवून या बायांनीं एक रामाचें व एक लक्ष्मीनारायणाचें अशीं दोन देवस्थानें स्थापून

* ह्यांस महाराज येथें राजवाडे यांच्या घरासमोर मिती श्रावण वा १० शके १७८४ रोजी फांशी देण्यांत आलें।

स्थापिली । ह्या लक्ष्मीनारायणाच्या देवळांत मराठ्यांचा भगवा झेंडा व पेशव्यांची गादी ही ह्या थोर बायांनी त्या च वेळीं स्थापिली व ती अद्याप तेथें आहेत । सई-बाईसाहेब नुकत्याच संवत् १९५३ त म्हणजे शक १८१८ त वारल्या. मैनाबाई-साहेब आणि काशीबाई व कृष्णाबाई अशा त्याच्या दोन्ही सुना त्यांच्या अगोदर कांहीं वर्षें वारल्या. ह्या चौघा बायानी कालक्रमणा अत्यत साधुरीतीनें केली, असें तत्रस्थ लोक सांगतात. कित्येक क्षुद्र लोकानी जंगबहादुराचा व ह्या बायाचा निंद्य सबध होता, वगैरे भिकार भारुडें रचिली; परतु त्यांत कांही तथ्य नाही नेपोलियन बोना-पार्ट याला व याच्या सबध्याना शिव्या देण्यात भूषण मानणारे कित्येक राष्ट्रात जसे कित्येक लोक आढळतात, तसेच नानासाहेब व त्यांचें गणगोत यांची निंदा कर-णारे कित्येक अल्पात्मे सापडतात इतकेंच. ह्यापलीकडे त्या प्रलापांत कांही अर्थ [१०
नाही. Curse a dog and then hang him ह्या तत्त्वज्ञानांत आपल-पोटेपणा तरी आहे, परतु To curse a man's relatives after his death, ह्यात कोणता मतलब आहे तें एक सैतान जाणें.

१५. श्रीमत नानासाहेब वगैरेंचा स्वभाव उमदा असून, त्यांची वृत्ति सत्त्व-गुणप्रधान अशी होती. शक १७७९ च्या 'नाना-गर्दी'चे पुढारी म्हणून त्याच्यावर आग पाखडून कानपूर येथील कत्तलीशीं ह्याचा सबध जोडण्याचा कांही इंग्रज लेखकांनीं क्षुद्र प्रयत्न केला आहे. परतु कानपूरच्या कत्तलीपासून शिपायांना परा-वृत्त करण्याचा नानासाहेबांनी पुष्कळ प्रयत्न केला; कत्तलीशी नानासाहेबाचा मुळींच सबध नव्हता, असें स्वतः श्री. बयाबाईसाहेब सागत आहेत.

१६. बाजीरावसाहेबांची मुलगी श्री. कुसुमाबाईसाहेब यांना गर्दीनतर स्थिर-[२०
स्थावर झाल्यावर त्यांचे श्वशुर बाबासाहेब आपटे यांनी रेसिडेंटाच्या परवानगीनें खाट-मांडूहून ग्वाल्हेरीस आणिलें. त्या सध्या काशी येथें दुर्गाघाटीं हरिहरि म्हणत स्वस्थ आहेत. रघुनाथरावांचे दत्तक पुत्र अमृतरावसाहेब चित्रकूटवाले याचा वश सध्या रायबरेलीस आहे. हा वंश रावबाजीच्या वशजाच्या पंक्तीत नसल्यामुळें, त्याच्यासबं-धानें ह्याहून जास्त लिहिण्याचें प्रयोजन नाही.

१७. येणेंप्रमाणें बाजीरावसाहेब पेशव्याच्या कुटुंबाची हकीकत आहे. पेश-व्याची औरस पुत्रसंतति बाजीरावसाहेबानंतर राहिली नाही. पेशव्याची पुत्री-संतति मात्र महाराष्ट्रात पाचपंचवीस घराण्यात आहे.

१८. सईबाईसाहेब याच्या मृत्यूनंतर, नेपाळसरकारानें त्याची जहागीर बिन-वारशी म्हणून जप्त केली. सध्या भगवा झेंडा व पेशव्याची गादी असलेले देव-[३०
स्थान मात्र चालू आहे. तेथें तावे उपनामक एक कऱ्हाडे कुटुंब पूजा करून असतें. उपरिनिर्दिष्ट चार खाशा बाया जोपर्यंत होत्या तोंपर्यंत सागली, पुणें, इंदूर, ब्रह्मा-

वत व काशी येथून त्यांचे स्नेहसंबंधी अधूनमधून जातें आतां यापुढें पेशव्यांच्या इतिहासाच्या संशोधकांखेरीज दुसरे कोणी तेथें जाईल, असा संभव दिसत नाहीं

वि का राजवाडे,
पां म पटवर्धन

~~~~~~~~

## ९५ कूपखननलक्षण–मराठी गद्य

पानें १–५

शेवटीं विक्रम संवत् १६८२ म्हणजे इ स १६२५ हा काल दिला आहे ग्रंथ ज्योतिषाचे आधारानें लिहिला आहे भाषा फार च आधुनिक केली आहे. वराहमिहिराच्या नुकत्या च उपलब्ध झालेल्या 'दगार्गलशास्त्र' या ग्रन्थांत जे नियम आढ-
१०] ळतात त्यांतील कांहींचा यांत समावेश केला आहे यांतील गोष्टींचें अनुभव पाहण्या सारखे आहेत 'दगार्गलशास्त्राचें' भाषांतरकर्ते रा गोरे हे याप्रमाणें त्यांस अनुभव आल्याचें लिहितात यांत आरंभीं दिलेले श्लोक 'दगार्गलशास्त्रां'त आढळत नाहींत, परंतु प्रथम 'दगार्गलशास्त्र' म्हणून 'वराहसंहिते'च्या ५३ व्या अध्यायांत आपण ज्योतिषदृष्ट्या या बाबीचा विचार केला आहे असें वराहमिहिर म्हणतो तेव्हां त्यांत हे श्लोक असल्यास न कळे

श्रीगणेशायनमः । अथ वापिचक्रं ॥ वापीचक्रं प्रवक्ष्यामि विशेषं सबदा शुभे । रोहिण्या गणयेदृक्षं यावत्तिष्ठति चंद्रमाः । मध्ये चत्वारि धिष्ण्यानि पूर्वादौ च क्रमं क्रमात् ॥ मध्ये शीघ्रजलं स्वादु पूर्वस्यां खंडितं जलं ॥ २ ॥ आग्नेय्यां शुभला वापी याम्यां वै निर्जला भवेत् ॥ नैर्ऋत्यामुदकं क्षारं पश्चिमे चोत्तमं जलं ॥ ३ ॥ वायव्यां
२०] वायुमतं च उत्तरे बहुधा जलं ॥ ईशान्यां स्वल्पकं तोयं वापीचक्रे नियोजयेत् ॥ ४ ॥ इति कूपचक्र ॥ दिग्गजस्समायुक्तं संवत्सरगजान्वितं ॥ अष्टभिस्तु हरेद्भागं शेष दिवसाश्च उच्यते ॥ ५ ॥ सजलं निर्जलं पीठ पाषाणं च पुनः पुनः ॥ शुभकर्म पंचभि गुण्यं चतुर्विंशति भाजित ॥ ६ ॥

[ पृष्ठ १ पाठ
पोट मलपृष्ठ

इत्यचैवमथोद्दिष्टं शेषमशुभमुच्यते ॥ चैत्रास शुक्रे इति माघ फाल्गुन पौषे तथा श्रावणमास कार्तिके ॥ एभि मासैः ३ एतु पारि सातं वित्तं च सौम्य च यशो नराणां ॥ सूर्य इमगने यदा भवति वै वाप्यां जलं कारितचे भद्रे वापि जलाश्रयो बहुवसा पाषाणमंगारके ॥ सौम्ये शुक्रगुरो जला
~~~~~~~~

यहुवसा पाषाणमंगारकः पाषाण कुटिले तमस्य द्विग्रहा राहोः फल केतुवत् ॥ य॰
द्विंध्य भागे खलु चद्रमा स्यात्तद्विग्विभागे लज (जल ?) निर्झराःस्युः ॥ तद्वाधिपे
क्रूरशुभान्विते स्यात्क्षार च गौल्य मुनयो वदंति ॥ मीने कूलीं रेमकरे वहूदकं
कुंभे वृषे चापि तथैव चार्ध ॥ आलिं च तौलिं जलसंज्ञमाहुः शेषास्त्वनुका अजलाः
प्रकीर्तिताः ॥ आता पाणि जाणायाचा प्रकार सांगें ॥ वापी कूप तडागादि मूहुर्त

[ पृष्ठ २ पोट.

घेळा पाहाव्यां ॥ त्या वेळेचे लग्न पाहावें । मग विचारावे । लग्न जळचर होय । चद्र
जळराशिस होय । लग्न स्वामी जळराशिस होय । अथवा
चद्र वा सूर्य लग्नी होय । अथवा चद्र वा शुक्र ४ असे
तरि बहुत पाणि लागेल । यामध्ये कांहि योग मिळाति [१०
क।हि न मिळतिं तर थोडे पाणी लागेल । असे जाणावे।
जरि जळयोग मिळाति पापग्रह लग्नी । ४ । होतील तर
पाणि न लागे जर जळचर लग्न होय आणि पापग्रह
होती तरी मध्ये खडक लागेल जरी तया पापग्रहा ते
शुक्र चंद्र देखेत तरि तो खडक फुटे खालि पाणि लागेल
असे जाणावे । जर चवथ्या स्थानी शुभग्रह देखत आणि

| | | |
|---|---|---|
| वू<br>उ<br>उ | च<br>चि<br>मृ | श<br>स्वा<br>अ |
| पू<br>पू<br>भ | रौ<br>ह अ<br>श्र | फ<br>वि<br>पू |
| म<br>पू<br>अ | आ<br>ज्ये<br>रे | पु<br>अ<br>उ |

[ पृष्ठ २ पा० २

पापग्रह होय तरि जितुके शुभग्रह देखतील तरि तितुक्या गजा अथवा तितुकियां
पुरुषा खडक लागेल । पापग्रहाचा भागा ३ तीनी भाग दीजे जितुक्या वेळा तीन तीन
फिटतील तितुक्या गजा खडक लागेल असे बोलावे । आतां पाणी कसे कसें [२०
लागेल ऐसे बोलावे । लग्नी १ अथवा ४ शुभग्रह होतील तरि पाणि मिष्ट लागेल । जरि
पापग्रह असतील तरि पाणि खारट लागेल । मेष ८ वृष ७ मिथु(न?) ५ कर्क ४
सिंह ५ कंन्या ५ तु(ळ?) ६ वृश्चि(क?) ७ धन १० मकर ५ कुभ ५ मीन ४ हे
अक राशिचे । जरि लग्नी चद्रशुक्र असती अथवा ४ असति तरि (ति?)तुक्या गजा
पाणि लागे ऐसे जाणावें । चद्रशुक्र नसती तरि तितुक्या पुरुषा पाणि
लागेल । आतां आणिक प्रकार सागेन । आदित्य १६ चद्र ४

[ पृष्ठ ३ पोट

मगल १० बुध २१ गुरु ७ शुक्र ५ शनि २१ हे ग्रह लग्नी रा ४ पडतां ज-
लज २ लग्न होय इतुक्या गजा पाणि लागेल ऐसे जाणावें जरी जलचर लग्न न
होय तरि तितुक्या पुरुष पाणि लागेल असें जाणावे जरि ग्रह नसेल तरि राशींच्या [३०
अंकापासून बोलावे । आता आणिक प्रकार सांगेन जेथे कूप विहीर तळे घर करणें

फसेल त्या भूमीची परिक्षा सांगेन भूमीमध्ये अवरस चौरस हात येक भूमि खणावी ते मृत्तिका खपुण भरावि जरि उणि होय तरि घरि मध्ये असे जाणावें जरि सम होय तरी शुभ कदापि निषेध नाहि जरि माति वाढेल तरी त्या स्थानीं सुख परम होय तेच माति रात्री तुलिजे जरि उणि होय तरि निके परंतु अशुभ नाहि जरी तुलना

[ पृष्ठ २ पाठ

करितां वाढ तरि घरे सुख भोग पशु होय आता या (1) पाण्याचे भूमीचि परिक्षा सांगेन जैशा मनुष्याचे आंगि शिरा असती सातशें चोविस ७२४ तेशा भूमीमध्ये आहेत एक पाणि यां ॥ या एक अग्निची एक वायुचा रसायणाचा बहुता परिचा शिरा असती त्या मध्ये पाण्याचा शिरा जाणाव्या धार्मी लक्षणे बोलिलि असति । ज्या १०]स्थलि पाणि नाहि तेथें वेताचें झाड मिळे साक्ष नीरे जरि असे तरि यां वेताचें झाडा पासुन पश्चिमेकडे गज १ म्हणिजे दीड पुरुष म्हणिजे मिष्ट पाणि लागेल प श्चिमे शार लागेल कांहि आटेना । जे ठाई जांभुलिचा वृक्ष वरचा सांखिला असें तये जांभुलि खालि पूर्व दीशेस वारुळ होय तरि जांभुलिचे पाला वे दक्षिणेकडे स- मिजे २ दोन्हे पुरुषां २ भत पाणि मिष्ट लागे तें पाणि कदापि खंडेना । तेथे दक्षि णेचा झरा लागे खण

[ पृष्ठ ४ पोट

र्म दक्षिणेचा झरा लागे । खणता अध पुरुषा मत्स्य लागे आणि कण कमचे या रंगा सारिखा पाषाण लागेर । त्या खालि निळि माति लागे तरि बहुत पाणि आहे एसे जाणावे भमि खणता शुध मेंढक निघे तया खालि पिवळि २०] माति लागे पुढे पिंपोळ्या पाषाण लागे तर त्या ठाइ बहुत पाणि असे असे जाणावे ज्या स्थळि औदुंबराचे झाड घरे सांग होय त्यापासून पश्चिमेकडे तीन गज ३ म्हणिजे ते पुरुषां १ पावशा सप निघे काळा पाषाण लागेल फोडा तेथे अडचा पुरुषां २॥ पाणि लागे खालि पांढळिची शिर लागेल कुडके पाषाणा चे निघति ६ जेथें गिरंजनाचा ठाइ अंजनाचा वृक्ष निरा सोपाला होय त त्या वृक्षा पासुन उत्त रेकडे १ तिहि हा आ वारुळ जरि होय तरि पश्चिमेकडे ३ हाता म्हणिजे तेथें ३॥

[ पृष्ठ ४ पाट

पुरुषा बहुत पाणि लागे ७ जे ठाइ वारुळावरि निर्गुडीचें झाड असे तरि त्यापासुन दक्षिणेकडे गज ३॥ मणिजे तेथें ३॥ पुरुषा पाणि लागे मिष्ट तें कांहि आटेना सर्वे दक्षिणेचा झरा लागेल ॥ ८ भूमी खणतां गजा २ तातड मासळि निघे उष्णती १०]माती होय तया उष्णती माति लागे ४ खालि वाळु निघे तया माटि मुरुम निघे।

तया खार्लें बहूत प्राणि लागे चहूकडे झरे सुटती ९ कोणेके स्छानि बोरिचे झाड पालेले साग एकले बरवे असे त्यापासुन हात २।३। वाछळ जरि असे तरि त्या वृक्षापासुन पश्चिमेकडे खणिजे तेथें पुरुषा ३ पाणि बहुत लागे खणता हाता २।३। पांढरि दुरोळि निघे दुरोजि म्हणजे पालि १० जवे सर्वे उंबर एक वाट निघालि तेथे पाणि लागले असे जाणावे त्यापासून दक्षिणेकडे ३ हातावर खणिजे २।३। मडूक निघे तेथे पुरुषा तींही पाणि लागेल दक्षिणेचा झ-

[ पृष्ठ ५ पोट

रा लागेल ११ काळ्या उबराच्या झाडा खालि वारुळ होय तरि त्या झाडा खालिं खणिजे २।३ पुरुषा पाणि लागेल तेथे पश्चिमेचा झरा लागेल १२ निरजने ठाइ बहाव्याचे झड सोपाले साग जरि होय त्या खाल्या जवालें वारुळ होय त्यापासून[१० पुरुषा १।। पाणि लागे तेथे प्राक् झरा असे १३ जे ठाई सात्वानाचा वृक्ष असे त्याजवळ वारुळ असे होय तरि त्या वृक्षा आणि वारुळा माझारि खणिजे खणिजे पुरुषा ९ का सर्प कपिला निघे त्या खालि रातळिं माति निघे त्या खालिं कुरुदासारिखा पाषाण लागे तेथें मिष्ट पाणि लागे ॥ १४ ॥ इति कूपादिखननलक्षण समाप्त ॥ छ ॥ ॥ शके १६८२ विक्रमसवत् ॥ छ ॥ ॥ छ ॥ छ ॥

[ पृष्ठ ५ पाठ

दत्तो वामन पोतदार.

# ९६ मल्हारीसुत

या च वरील बाडात एक २१ श्लोकाचें गणेशस्तोत्र आहे त्याचा कर्ता 'मल्हारीसुत'. ह्यांतील निम्मे श्लोक पान फाटून गेल्यामुळें गहाळ झाले आहेत. शेवटचा [२० २२ वा श्लोक असाः—

मल्हारीसुत दास जनार्दन रे ।<br>
म्हणे × री मुक्तिपथासि ने रे ।<br>
नको हेत ठेऊं × र्ळी माजि जाण ।<br>
भजे मोरया मोरया देव जाण ॥ २२ ॥

दत्तो वामन पोतदार.

# ९७ चिकोडी येथील शक ९१० तील एक ताम्रपट

१ हा ताम्रपट चिकोडी येथील रा आदप्पा काळप्पा उपाध्ये यांजकडून पहाण्यास मिळाला तीन पत्रे आहेत व ते कडींत अडकविलेले आहेत कडीवरील मुद्रेवर वराहलांछन आहे उत्तरचालुक्य जो तैलप त्याच्या साम्राज्यांत ताम्रपट कोरविल्यामुळें चालुक्यांचें लांछन मुद्रेवर कोरविलें असावें दर पत्र्याची लांबी १' १", रुंदी ७", जाडी ⅛" आहे व कडीसुद्धां तिन्ही पत्र्यांचें वजन सुमार २॥ शेर ( पक्के ) आहे पत्रे तांब्याचे आहेत

२ अक्षर शकशतक १ ० ० तील महाराष्ट्रांतील आहे.

३ भाषा संस्कृत आहे

१०]४ प्रथम श्लोकांत सखा म्हणून जिनाचें नांव व सद्धर्म म्हणून जैनधर्माचें नांव घेतलें आहे त्यावरून दिसतें कीं, ताम्रपट कोण्या तरी जैनानें कोरविला आहे दुसऱ्या श्लोकापासून पांचव्या श्लोकापर्यंत राष्ट्रकूटांच्या वंशांतील कांहीं नांवें दिलीं आहेत, तीं येणेंप्रमाणें:—

१ शुभतुंग
२ तत्सुत जगत्तुंग
३ तत्सुत इंद्रराज
४ तद्सुत अमोघवर्ष श्रमणजमल
५ तत्सुत यद्नामा कृष्णराज
६ तद्भ्रातृ खोट्टिग
१०] ७ वद्दिग

वद्दिगानंतर राष्ट्रकूटांचें राज्य वृद्धि पावल्याचें तैलप चालुक्याच्या दृढपणामुळें थांपलें असे करोद्गार पांचव्या श्लोकांत काढले आहेत शुभतुंग म्हणजे दुसरा अकालवर्ष–शुभतुंग–कृष्ण हा दुसऱ्या कृष्णापासून खोट्टिगापर्यंत इतरत्र राष्ट्रकूट ताम्रपटांप्रमाणें च हा हि ताम्रपटांत नांवें दिलीं आहेत परंतु, खोट्टिगानंतर वद्दिग राजा झाला, असें म्हटलें आहे इतर ताम्रपट कक्कल असें नांव देतात हा वद्दिगा नंतर राष्ट्रकूटांचें राज्य संपून तैलप चालुक्याचें राज्य सुरू झालें इतकें कथन केल्यानंतर, ताम्रपटांत दक्षिण कोंकणच्या सिलाहारांची वंशावळ येणेंप्रमाणें दिली आहे —

धंम्मियर
|
तत्सुत चामल्ल किंवा अम्मल्ल
|
तत्सुत ऐयप
|
तत्सुत आदित्यवर्मा
|
तत्सुत अवसर
|
तत्सुत इंद्र
|
तत्सुत भीम
|
तत्सुत अवसर ( शक ९१० )

इतर ताम्रपटांत धम्मियराचा पुत्र ऐयप सांगितलेला आढळतो.
धम्मियराचा पुत्र चाम्मल्ल किंवा अम्मल दिला असून, त्याचा पुत्र ऐ
आहे. इतरत्र ताम्रपटांत ऐयपाचा मुलगा अवसर दिलेला आहे. ह्या
पाचा मुलगा आदित्यवर्मा दिला आहे. बहुशः अवसराचें
आदित्यवर्मा असावें. यानतरची वंशावळ इतरत्रप्रमाणें च आहे.

शक ९१० त राज्य करणाऱ्या ह्या अवसर सिलाराच्या अमलांत,
मठ मठिका यांस काही भाग दिलेला आहे. दानपत्राचे शेवटी नेह
अनुसरून ठरलेले तीन श्लोक आहेत. त्यांचा अर्थ दिलेला नाही.

## पत्रा पहिला दुसरी बाजू

१ ॐ जयतुतरां सर्व्वज्ञो नन्दन्तु जनाश्च राजगोविप्राः । 
२ वर्द्धन्तामविनाशि च शासनं भवतु ॥ य इह परमपृथ्वी
३ भो वल्लभो ऽ भू दिन इव शुंभतुङ्ग स्तेजसा सुप्रसिद्धः ।

---

सर्वज्ञाचा विशेष जय असो, लोक आनंदित होवोत, राजा गाई
प्रमुदित होवोत । सद्धर्मांची वृद्धि होवो व (हे) शासन चिरकालिक 
तेजानें सुप्रसिद्ध जणु सूर्य च व पृथ्वीचा शास्ता असा शुभतुङ्ग 
झाला । त्याचा पुत्र प्रतापी, परमशूर, व ज्यानें सर्व शत्रूस जि

४ दतिशूरस्तस्य पुत्र॰ प्रतापी विजितसकलशत्रु श्रीजमपुत्र
५ देव॰ ॥ सकलविबुधबन्धु स्तत्सुतो मित्यवर्ष्यो ऽ भवदिव दिवजन्द्र॰ श्री
६ न्द्रराजो जितात्मा । तदनु तदनुजोऽभून्नृमियोऽमोघवर्ष्यो नृपगुण
७ रमणीय॰ सर्व्वसामन्तनाथ ॥ अथ वनगजमल्लायह्वना
८ मप्रसिद्ध॰ समभवदवनीशस्तत्सुत कृष्णराज । निहतनिखि
९ लशत्रो स्तस्य धर्मैकबन्धो स्तदनु विधिवशेन भ्रातरि भ्रातरा
१० ज्ये ॥ लोकप्रसिद्धसत्यागभोगादिगुणशालिनि । श्रीमत्खो
११ ट्टिगदेवे तु पर लोक गतें सति ॥ श्रीराष्ट्रकूटान्वयकल्पवृक्षो
१२ त्तुङ्गाङ्कुरे वड्डिगदेवनाम्नि । श्रीतैलपानल्पनगातिभारावमा

१०] पत्रा दुसरा बाजू पहिली

१३ नवृद्धौ सति दैवयोगात् ॥ ५ इत शिलारवर्णनम् ॥ श्रीमान्वि
१४ द्याधरेन्द्रोऽभूत्परार्थनिरत॰ सदा । जीमूतकेतो सत्पुत्रो नाम्ना
१५ जीमूतवाहन॰ ॥ मत्वा तृणवदात्मान धीर प्रादाद्गरुत्मते ।
१६ यो नागरक्षणे यश॰ शिलारास्य स्ततो ऽ भवत् ॥आसीत्तद्वंशान्वये श्रीमा
१७ न्राजा धर्म्मियर॰ पर । अधिवेलाकुलं रम्यं योऽकरोद्बलिपत्तनम् ॥
१८ तत्र चाम्मट्टनामाभूत्सुतो निर्ज्जिताहित॰ । प्रचण्डदण्ड स्तत्पुत्रस्त
१९ मभूदेयपो नृप॰ ॥ आदित्यवर्म्मा पुत्रोऽभूत्तस्माद्यादित्य

---

*जगत्तुङ्ग देव नांवाचा होता* ॥ *त्याचा मुलगा, सर्व विद्वानांचा पोषक*, दुसरा इन्द्र च अशी नित्यवर्ष इन्द्रराज म्हणून होता । त्याचे मागून त्याचा भाऊ पृथ्वीस प्रिय असलेला, नृपगुणांनी सालंकृत, सर्व्वसामन्तांचा (तो) श्रेष्ठ असा अमोघवर्ष नांवाचा होता ॥ नंतर त्याचा पुत्र कृष्णराज हा अवनीश झाला, तो वनगजमल्लायह्व या नांवानें प्रसिद्धीस आला । धर्माचा एक बंधु व सर्व शत्रूंचा नाश करणारा तो त्याच्या मागून दैववशात् त्याचा भाऊ, जगीं प्रथित अशा त्यागभोगादि गुणांनीं युक्त, जो खाट्टिगदेव तो राजा झाला ॥ तो स्वर्गी गेल्यावर, राष्ट्रकूटांच्या वंशरूपी कल्पवृक्षाचा अंकुररूपी जो वड्डिगदेव तो श्रीतैलप हाच कोणी महानग त्याच्या भारानें वृद्धि पावला नाहीं हें दुर्दैव च होय ॥

येथपासून शिलारकुलाचें वर्णन । जीमूतकेतूचा सत्पुत्र, विद्याधरांचा श्रेष्ठ, परोपकारी तत्पर, जीमूतवाहन नांवाचा होता ॥ आपल्या स्वतःस तृणवत् मानून त्या धीरानें नागरक्षणाकरितां गरुडास आपला देह दिला त्या दिवसापासून त्या वंशास 'शिलार' म्हणून नांव पडलें ॥ त्या कुलांत येमपशाली असा 'धर्मियर' नांवाचा राजा झाला । त्यानें '*बलिपुर*' ज्याची सीमा समुद्रापर्यंत गेली आहे, असें विस्तृत व रम्य केलें त्याचा पुत्र शत्रूंस ज्यानें जिंकिलें आहे असा 'आमट्ट'

२० वंत्स्त्रयम् । प्रतापापास्तवैरीन्द्रतमोराशी: प्रजाप्रियः ॥
२१ अवसर इति पुत्र स्तस्य जातो जितारिः प्रथितपरमकीर्त्तिर्द्ध
२२ र्म्यकर्म्माभिरामः । समभवदथ : शक्रवद्विक्रमाढ्यः सकलगु
२३ णगरीयानिन्द्रराज स्तु तस्मात् ॥ समभवत्तनयो नयवां स्ततो ज
२४ गति भीम उदारतमोऽभयः । य इह भीम इव प्राथितोऽखिलै
२५ र्नृपगुणै र्गुणवद्भि रुपासितः ॥ सैहिकेय इव योऽतिदुर्ज्ज

## पत्रा दुसरा बाजू दुसरी

२६ यो ग्रस्तकान्ततरचन्द्रमण्डलः । यश्च काम इव मानिनीमन
२७ स्त्यक्तदर्प्पमकरोन्मनोरमः ॥ तत्पुत्रस्यावसरनृपतेर्द्धर्म्मपु
२८ त्रोपमस्य सत्यत्यागाद्यनुपमगुणालकृतेरस्तशत्रोः । कन्दर्प्प [१०
२९ स्य परिमितमहारूपसौभाग्यलक्ष्म्या पूज्ये राज्येऽत्र ब
३० लिनगरे वर्द्धमानेऽसमाने ॥ ९शकनृपकालव्यपगत
३१ शतेषु नवसूत्तरेषु दशवर्षैः । श्रीसर्व्वधारिवर्षे कार्त्ति
३२ कशित–सोमवारपञ्चम्याम् ॥ श्रीमदवसरराजाय ।
३३ सिद्धैश्रेष्टिपुत्रो रेउमश्रेष्ठी तत्सुतो नागैश्रेष्ठी
३४ तथा छट्ठमैश्रेष्टितनयो रेवणश्रेष्ठी तत्पुत्रो लोकै

---

नांवाचा होता । ज्याचें शासन अत्यत कठिण असा त्याचा पुत्र 'ऐयप' म्हणून झाला ॥ दुसरा आदित्य च काय असा त्याचा आदित्यवर्मा नांवाचा पुत्र होता । त्यानें आपल्या प्रतापानें स्वतःच्या श्रेष्ठवैऱ्याचा ( अधकार ) नाश केला व तो प्रजेस अत्यत प्रिय होता ॥ धर्मकर्मांनी अभिराम व जित आहेत शत्रू ज्यानें असा त्याचा पुत्र अवसर नांवाचा होता । त्याचा पुत्र इंद्राप्रमाणें पराक्रमी, व सर्वश्रेष्ठ-गुणांनी युक्त असा इन्द्रराज नावाचा होता ॥ नंतर गुणिजनानी उपासित, नृप-गुणांनी विश्रुत, अपरभीम च जणू, अत्यंत उदार, व नीतिमान् असा त्याचा पुत्र भीम म्हणून झाला ॥ सुंदर अशा चन्द्रमण्डलाचा ( चंद्रवशाचा ! ) ज्यानें ग्रास केला आहे असा दुसरा दुर्जय राहू च काय, अशा त्यानें आपल्या रूपानें मदनाप्रमाणें मानिनीच्या मनांतील गर्वाचें हरण केले ॥ त्याचा पुत्र अवसर. ज्यानें शत्रूचा नाश केला आहे, जो सत्य, त्याग इत्यादि गुणांनीं अलंकृत, जो दुसरा धर्मपुत्र च, व ज्याचे रूपसौंदर्यानें सौभाग्यलक्ष्मी परिमित झाली आहे असा दुसरा कंदर्पच तो होता. त्याच्या पूज्य राजवटींत बलिनगराची असमान भरभराट झाली ॥. शक ९१० सवत्सर सर्वधारि या वर्षी कार्तिक शुद्ध ५ सोमवारीं या श्री अवसर राजास सिद्धैश्रेष्ठींचा पुत्र रेउमश्रेष्ठी व त्याचा पुत्र नागैश्रेष्ठी, तसेंच

५५

३५ श्रेष्ठी तथा महादेवश्रेष्ठिपुत्र' खेत्रेय * इति त्रयोऽपि क्रमागतकिं -
३६ जलपुळींसे जीवलोकद्वयस्थिरीकरणार्थं चत्वारिंशद्दीनारजानि
३७ तां पादपूजां मावुः । अर्हणमस्य द्रव्यपर्व्ययार्थे पूगफलछक्षद्व
३८ य म्प्रतिवर्षं त्रिभिरेव दातव्यम् । × किंच । श्रीरेवणार्यमन्मु

पत्रा तिसरा बाजू पहिली

३९ डिश्रेष्ठिनागपालामात्यपुत्रैर्न द्रव्यादिप्रधान राजपुरुष
४० सकलवृद्धनगरद्धज्ञामपञ्चमठस्थानमठिकाप्रथीविवित
४१ श्रीमद्द्वसरराजपुत्रपौत्रादिभिस्तत्पुत्रपौत्रैश्च पालनी
१०]४२ यमेतद्धर्म्मार्थमिति ॥ बहुभिर्व्वसुधा भुक्ता राजभि' सगरा
४३ दिभिः । यस्य यस्य यदा भूमि स्तस्य तस्य तदा फलम्॥ स्वदत्तां
४४ परदत्तां वा यो हरेत वसुंधराम् । षष्टिवर्ष्षसहस्राणि वि
४५ ष्टायां जायते कृमि ॥ सामान्यो ऽ यं धर्म्मसेतुर्नृपा
४६ णां काले काले पालनीयो भवद्भि' । सर्व्वानेतान्भाविन'

४७ पार्थिवेन्द्रान्भूयो भूयो याचते रामभद्र'॥

---

लक्ष्मीश्रेष्ठीचा मुलगा रेवणश्रेष्ठी व त्याचा पुत्र सोढे श्रेष्ठी, व तिसरा महादेवश्रेष्ठीचा पुत्र खेत्रेटा, त्याचा आदित्यवर्मा या तिघांनीं पूर्वपरंपरागत चालत आलेली किंजळ व हुलीस या दोन गांवाच्या सुखाकरितां चाळीस दिनार पादपूजा म्हणून दिले ॥ याची पुजा म्हणून व जें पूजाद्रव्य द्रव्य याच्या खर्चाकडे यावयाचें तें तिघांनीं दरवर्षी १ लक्ष सुपाऱ्या स्वरूपांत द्यावयाचें। नागश्रेष्ठीचा भाग मी परिपालन करावयाचा नाहीं परंतु

यापुढील अभ बरोबर लागत नाहीं साधारण समजतो तो असा'—इत्यादि प्रधान राजपुरुषांनीं वृद्धनगरांत चालविलेले पांच मठ व तीन मठिका यांस श्रीरेवण आर्य मनुष्यश्रेष्ठि व अमात्यपुत्र (?) नागपाल यांनी दिलेला भाग मात्र श्रीमद् अवसर राजाच्या पुत्रपौत्रांनीं त्यांच्या पुत्र पौत्राकडे आचन्द्रार्क चालवावा ॥ × ×

---

* +++ श्रेष्ठिपुत्र आदित्यवर्म्मा +—+नागश्रेष्ठिनो भागो न मया: पालनीय:

१ क्षत्रिय शब्दापभ्रंश: नाम वा मास्तु । २ यामदूपनाम । अथवा अर्हत्स्तम् । ३ प्रधानराजपुरुषार्थें नांव । पुढील उतान्याववरून । ४ अर्हत्स्तम्-पुल= पुळा-पळशोऽनुपयुक्तम् ।

४८ श्रीमन्नागरसान्धिविग्रहवता स्वस्वामिनोऽनुज्ञया श्रीम
४९ द्वामनसूनुना च कविना श्रीदेवपालेन हि। विस्पष्टं लिखि
५० तं स्वविस्तरसमुत्कीर्ण्णं तथा वज्जडे नाकल्पावधि साधु तिष्ठतुत
५१ रां सर्व्वैः समं शासनम् ॥ इति मङ्गलमहाश्रीः ॥ © ॥

# ९८ कल्यारंभ व भारतीय युद्ध

१ भारतीय युद्ध कधी झालें, ह्या बाबीचा शोध व निर्णय युरोपीयन लोक गेलीं शंभर वर्षें करीत आहेत. इतकी वर्षें घालवून त्यांनी शेवटी असा निर्बंध करून घेतला आहे की, भारतीय युद्ध इसवीसनापूर्वी फार तर पधराशें वर्षांपलीकडे झालें नसावें. ह्या निर्बंधाला ते विष्णुपुराणाचा आधार देतात.

यावत्परीक्षितो जन्म यावन्नंदाभिषेचनं । [१०
एतद्वर्षसह तु ज्ञेयं पंचदशोत्तरं ॥

पंचदशोत्तर किंवा पंचाशदुत्तरं अशा अर्थांचे पाठ इतर दोनचार पुराणांत आढळतात. त्यांच्यावर भिस्त ठेवून, व नंद इसवी सनापूर्वी ४०० वर्षे होते असें ठरवून, युरोपीयन शोधक म्हणतात की, भारतीय युद्ध इसवीसनापूर्वी १५०० वर्षे झालें असावें. हें युरोपीयनाचे म्हणणें आपल्या इकडील विद्वानास मान्य नाही. कां की, कलियुगाला प्रारभ शकापूर्वी ३१७९ व्या वर्षी व संवतापूर्वी ३०४४ व्या वर्षी झाला व त्या च वेळी भारतीय युद्ध झालें, अशा अर्थाची वचनें पुराणांतून, शिलालेखांतून, व ज्योतिषग्रंथांतून अनेक आहेत. त्याचा आधार सोडून, युरोपीयनाचें म्हणणें ग्राह्य करण्यास विशेष कारण दिसत नाही. ह्यावर प्रतिप्रश्न असा उद्भवतो कीं, परीक्षितीच्या जन्मापासून नंदांच्या अभिषेकापर्यंत १०५०,१०१५, ९५०,[२० वगैरे जी काही वर्षे गेलीं म्हणून पुराणात सांगितलें आहे त्याचा अर्थ काय ? युरोपीयन सस्कृतज्ञांच्या पद्धतीप्रमाणें ज्या विधानाची उपपत्ति व सगति आपल्या म्हणण्याला जुळत नाही तें विधान बेधडक क्षेपकात उडवून देण्याचा उपटसुंभ व्यवहार स्वीकारावयाचा की काय ? तर असा प्रकार नाही. युरोपीयनांची उपटसुंभ पद्धती न स्वीकारतां, आपल्या इकडील शोधकांचे असे म्हणणें आहे की, पुराणांतील वचनांचा अर्थ युरोपीयन लोक सकृद्दर्शनी करतात तसा नाही यावत्परीक्षितो जन्म

× ॥ श्री वामनाचा मुलगा कवि देवपाल जो सन्धिविग्रहाचा अधिकारी त्यानें आपल्या स्वामीचे अनुज्ञेनें स्पष्ट असें लिहिलें व वज्जडानें तें खोदलें. सर्वांसह त हें शासन कल्याचे अवधिपावेतों चिरकालिक होवो ॥॥ इति मङ्गलम ॥ ड् ॥

इत्यादि वचनांचा अर्थ युरोपीयन लोकांस करतां आला नाहीं, अर्थात् त्यांच्या यु
कोंच्या विधानांनीं आपल्या मतांत फेरबदल करून घेण्याची आवश्यकता भासत
नाहीं आणखी कोणी प्रतिपक्ष असा करतात कीं, युरोपियन लोकांचें म्हणणें एकीकडे
राहो तुमच्यांतील च रा श्र्यंबकराव काळे "यावत्परीक्षितो जन्म" इत्यादि वच
नांचा आधार घेऊन भारतीय युद्ध इसवीसनापूर्वी १२०० वर्षांच्या सुमारास झालें
म्हणून म्हणतात त्याची वाट काय ? तर या प्रतिपक्षावर आमचें हें च म्हणणें
आहे कीं, रा काळ्यांना हि "यावत्परीक्षितो जन्म" इत्यादि वचनांचा अर्थ युरोपीय
नांच्या इतका च कळला आहे. सबब, काळ्यांचें म्हणणें हि आम्हीं कबूल करीत
नाहीं येथें रा काळे विचारतील कीं, "यावत्परीक्षितो जन्म" इत्यादि वचनांचा खरा
१०] अर्थ जर मला कळला नसेल, तर तो मला कळविण्याची मेहेरबानी करा
काळ्यांची ही विनंति रास्त आहे तिचा बहुमान करणें अत्यन्त अगत्याचें आहे.

२ वायुपुराणांत खालील श्लोक आहेत:—

महादेवाभिषेकात्तु जन्म यावत्परीक्षित: ।
एकवर्षसहस्रं तु ज्ञेयं पञ्चाशदुत्तर ॥ १ ॥
प्रमाणं वै तथा चोक्तं महापद्मान्तरं च यत् ।
अंतरं तच्छतान्यष्टौ षट्त्रिंशच्च समा: स्मृता: ॥ २ ॥
एतत्कालान्तरं भाव्या आंध्रान्ता ये प्रकीर्तिता: ।
भविष्यैस्तत्र संख्याताः पुराणज्ञैः श्रुतर्षिभि: ॥ ३ ॥
सप्तर्षयस्तदा प्राहु: प्रतीपे राज्ञि वै शतं ।
२०] सप्तविंशै: शतै भाव्या आंध्रान्ता तदा पुन ॥ ४ ॥
सप्तर्षयो मघायुक्ताः काले पारिक्षिते शतं ।
आंध्रान्ते सचतुर्विंशे भविष्यंति मते मम ॥ ५ ॥

मुख्य मुद्द्याचे श्लोक ते हे च त्यांचा अर्थ करावयाचा आहे येथें, पहिला च
तेवढा श्लोक आधाराला घेऊन युरोपियन लोकांनीं समाधान मानिलेलें आहे
बाकीच्या चार श्लोकांकडे त्यांनीं लक्ष मुद्दां दिलेलें नाहीं अथात् अपवाद पुरस्
जनेस घडून निर्णय करू पहाणाऱ्या पंडितमन्यांच्या ह्या वागण्याची उपेक्षा केल्यास
तें न्याय्य च होईल तथापि उपेक्षा रा काळे यांची करतां येत नाहीं कारण, त्यांनीं
पांच हि श्लोक जमेस धरले आहेत व त्यांची सगति लावण्याचा प्रयत्न केला आहे
पहिल्या तीन श्लोकांचा अर्थ काळे येणेप्रमाणें करतात —

३०] "(१) महादेवाच्या अभिषेकापासून परीक्षितीच्या जन्मापर्यंत १०५१ वर्षे झालीं
(२) याच प्रमाण, परीक्षितीच्या अभिषेकापासून महापद्मापर्यंत ८३६ वर्षे झालीं,
असें मानतात (३) इतका च काल महापद्मापासून आंध्रांच्या अंतापर्यंत झाला

तापर्च्या वेळी सप्तर्षि जे होते तेव्हांपासून आंध्राच्या अंतापर्यंत २७००, व येतील. (५) परीक्षितीच्या काळी सप्तर्षि मघांत होते. आंध्रांच्या अखेरीस २४ नत्री येतील."

असा एकंदर पंचविधानात्मक अर्थ काळे करतात. त्यांच्या मतें पहिल्या ला प्रमाण दुसरें विधान आहे. परंतु हें मत रास्त नाही. अशाकरिता की, अर्थाचे जे श्लोक मत्स्यपुराणांत आहेत त्यांचा मतलब काळ्यांच्या विधा- ोपक नाहीं. मत्स्यपुराणांतील श्लोक असेः—

महापद्माभिषेकात्तु यावज्जन्म परीक्षितः ।
एतद्वर्षसहस्रं तु ज्ञेयं पंचाशदुत्तरं ॥
पौलोम्न स्तु तथांध्रात्तु महापद्मांतरं पुनः । [१०
अनंतरं शतान्यष्टौ षट्त्रिंशत्तु समास्तथा ॥
तावत्कालान्तरं भाव्यं आंध्रांतादापरीक्षितः ।
भविष्ये ते प्रसंख्याताः पुराणज्ञैः श्रुतर्षिभिः ॥
सप्तर्षयो मघायुक्ताः काले पारीक्षिते शतं ।
ब्राह्मणास्तु चतुर्विंशा भविष्यंति शतं समाः ॥

श्लोकाचा अर्थ असाः—महापद्माच्या अभिषेकापासून परीक्षितीच्या जन्मापर्यंत किंवा ९५० (जसा अर्थ घ्यावा तसा) वर्षे गेली. त्यानंतर लागलीच पासून पुलोमन् आंध्र याच्यापर्यंत ८३६ वर्षे गेली. हे दोन काळ मिळून जे- ळ तेवढा परीक्षितीपासून आंध्रान्तापर्यंत गेला. आतां, ह्या मत्स्योक्तींत काळ्याचें धान (परीक्षितीच्या अभिषेकापासून महापद्मापर्यंत ८३६ वर्षे झाली) [२० ठ नाहीं. उलट वायु ज्याला महादेव म्हणतो त्याला च मत्स्य महापद्म म्हणतो. वायुपुराणातील पहिल्या तीन श्लोकाचा खरा अर्थ खालीलप्रमाणें आहेः— ऊर्फ महापद्म याच्या अभिषेकापासून परीक्षितीच्या जन्मापर्यंत १०५० किंवा र्षे गेली. महापद्मापासून आंध्रान्तापर्यंत अंतर ८३६ वर्षांचे होतें. मत्स्यपुरा- श्लोकांचे भाषान्तर करिताना, (आंध्रान्तापासून परीक्षितीपर्यंत आणखी ति- वर्षे गेली) हें वाक्य, मुळांत तसे शब्द नसतांना, काळ्यांनी पदरचें घुस- हे. काळ्यांचें हें कृत्य अशास्त्र आहे, अर्थात् अविश्वास्य आहे, व त्याच्यावर ली सर्व इमारत डळमळीत आहे. मूळात 'आणखी' असा शब्द नाहीं. "आं- ासून परीक्षितीपर्यंत इतकें कालान्तर समजावें" असा "तावत्कालान्तर आंध्रान्तादापरीक्षितः" ह्या ओळीचा अर्थ आहे. "इतकें कालान्तर" म्हणजे [३० + ८३६ मिळून १७८७ इतकें अंतर. म्हणजे परीक्षितीपासून आंध्रान्तापर्यंत वर्षे झाली असा सरळ अर्थ निघतो. ई. स. ३०० च्या सुमारास आंध्रांचा

अंत झाला असें समजल्यास, परीक्षितीचा काल इसवीपूर्वी १४८७ येतो तो का त्यांना नको आहे त्यांना इसवीपूर्वी १२६१ हा काल हवा आहे इसवीसन २५० त आंध्रांचा अंत झाला असें समजल्यास, परीक्षितीचा काल इसवीपूर्वी १५३७ येतो तो तर काल्यांना मुळीं च नको का नको त्याचें कारण येणेंप्रमाणें परीक्षितीच्या जन्मापासून ९५१ वर्षांचा हिशेब काल्यांनीं केला, तों ९५१ व्या वर्षाला चन्द्रगुप्त मौर्याचा काळ येऊं लागला, तेव्हां काल्यांनीं असें ठरविलें कीं, वायुपुराणोक्त जो महादेव तो चन्द्रगुप्त होय, नंद नव्हे हा शोध केल्यावर आंध्रान्तापर्यंतच्या ८३६ वर्षांचा हिशेब पहातां काल्यांना असें दिसून आलें कीं, चंद्रगुप्तापासून आंध्रान्ता पर्यंत ८३६ वर्षे होत नाहींत, फक्त ३२५ + २५० म्हणजे ५७५ वर्षे होतात तेव्हां
१०]काल्यांनीं दुसरा असा शोध लाविला कीं, ८३६ हीं पुराणोक्त वर्षे शातवाहनांच्या कारकीर्दीचा व इतर आणीक कारकीर्दींचा घोटाळा करून चुकीचीं दिलीं आहेत तात्पर्य, शोध व छाटाछाट करतां करतां काल्यांना असें आढळून आलें कीं, वायु पुराणोक्त जीं वाक्यें आपण आधाराला घेतलीं तीं सर्व चुकीचीं आहेत. राजांचीं नांवें चुकीचीं आहेत, वर्षांची संख्या चुकीची आहे, शब्दरचना चुकीची आहे, तात्पर्य, येथून तेथून पुराणांतील वचनें कवडीमोल आहेत, असा निर्णय काल्यांच्या शोधांपासून फलित झालेला आहे वायुपुराणोक्त वचनाचा काळे जो अर्थ करतात तसा अर्थ करू गेल्यास असा च निर्णय प्राप्त होईल, यांत संशय नाहीं तेव्हां, असें समजावयाचें कीं काय कीं, वायुपुराणांतील हीं वचनें निष्फळ वाष्कळ आहेत व त्यांचा विचार करणें केवळ कालहरण आहे ? तर असा प्रकार नाहीं, सरळ अर्थ
२०]केला असतां उत्तम संगति लागते कशी लागते तें सांगतों

आपल्या एकोनएक सर्व ज्योतिष्यांच्या मतें शककालापूर्वी ३१७९ वर्षे कलियुगारंभ झाला तसें च द्वापर आणि कलि यांच्या संधीस भारतीय युद्ध झालें, असें हि एकोनएक सर्व ज्योतिष्यांचें मत आहे भारतीय युद्ध द्वापराच्या अंतीं व कलीच्या प्रारंभीं झालें, असें मत आर्यभटापासून आजपर्यंत जेवढे म्हणून योग्य ज्योतिषी झाले तेवढ्या सर्वांचें आहे म्हणजे शक ३९८ पासून हें मत प्रचलित आहे व तत्पूर्वी हि हें च मत प्रचलित होतें असें दिसतें कारण, यद्यपि आर्यभट, शक ४२१ पर्यंत कलीचीं ३६०० वर्षे गेलीं आणि कल्पाचीं ६ मन्वन्तरें व २७३/४ युगें गेल्यानंतर भारतीय युद्ध झालें असें मानतो, तथापि एका मन्वन्त रांत ७२ युगें असतात, असें तो म्हणतो आणि याशेवटल्या विधानाकरितां, ब्रह्मगुप्त
३०]त्याला 'श्रुतिस्मृतिविरोध करणारा' म्हणून दूषण देतो याचा अर्थ इतका च कीं, शककालापूर्वी ३१७९ वर्षे कलियुगारंभ व भारतीयसंग्राम झाला, असें मत आर्यभटा पूर्वी फार प्राचीनकाळापासून प्रचलित होतें तात्पर्य, भारतीय युद्ध व यांचे शक

पूर्वी ३१७९ वर्षे झालें, हें मत भारतवर्षांत सार्वत्रिक आहे. ह्या मताला अपवादक म्हणून वृद्धगर्गाचा वराहमिहिरोद्धृत श्लोक देत असतात; तो श्लोक असा:-

आसन्मघासु मुनयः शासति पृथ्वीं युधिष्ठिरे नृपतौ ॥
षड्द्विकपंचाद्वि ( २५२६ ) युतः शककाल स्तस्य राज्ञ श्च ॥

–बृहत्संहिता, सप्तर्षि चार.

ह्या श्लोकाचें भाषान्तर सामान्यतः असें करतातः–युधिष्ठिर म्हणजे पंडुपुत्र धर्मराजा पृथ्वीचें राज्य करीत असतां, मुनि (सप्तर्षि) मघानक्षत्री होते शककालांत २५२६ मिळविले म्हणजे त्या राजाचा ( युधिष्ठिराचा ) हि ( काल येतो ) या श्लोकाच्या ह्या अर्थावरून अशी निष्पत्ति निघते की, शककालापूर्वी २५२६ वर्षे म्हणजे कालियुगाची ६५३ वर्षे(३१७९—२५२६) गेली तेव्हा पांडव व भारतीय युद्ध झालें [१० इतर सर्व ज्योतिषी भारतीय युद्ध शकापूर्वी ३१७९ वर्षे झालें असें मानतात व गर्गवचनाप्रमाणें वराहमिहिर तें युद्ध शकापूर्वी २५२६ वर्षे झालें असें मानतो, असें सकृद्दर्शनी दिसतें. दोहो मतांत ६५३ वर्षांचें अंतर पडतें. अर्थात् ३१७९ हा आंकडा भारती युद्धाचा खरा मानावा की २५२६ हा आकडा खरा मानावा, असा द्वैधीभाव उत्पन्न होतो. आणि या द्वैधीभावामुळें ह्या दोन्ही आंकड्यांवरचा विश्वास उडून जातो. वराहमिहीर म्हणजे कांही लहानसहान व्यक्ति नव्हे, बडें धेंड आहे. तो भारतीय युद्ध शकापूर्वी २५२६ वर्षे झालें, असें ज्याअर्थी गर्गवचन देऊन सांगतो, त्याअर्थी शक ४२७ त भारतीय युद्धाच्या कालासंबधानें दोन मतें होती असें सकृद्दर्शनीं म्हणावे लागतें. परंतु हें केवळ सकृद्दर्शन झालें. वराहमिहिर कलियुग शकापूर्वी ३१७९ वें वर्षी सुरू झालें हें मानतो यात तर बिलकुल संशय नाही. म्हणजे वराह-[२० मिहिराला कलियुगाचा ३१७९ हा शकपूर्वकाल इतर ज्योतिष्याप्रमाणें च मान्य आहे. इतर ज्योतिष्याप्रमाणें च वराहमिहिरापुढें श्रुतिस्मृतिपुराणग्रंथ होते. ह्या पुराणग्रथांत पाडव व भारतीय युद्ध कलियुगारंभी झाले असें स्पष्ट व एककठरवाने सांगितलें आहे. अर्थात्, हें पुराणवचन वराहमिहिराला माहीत होतें, ह्यांत संशय नाहीं. वराहाच्या पूर्वी नुकता च झालेला जो आर्यभट तो भारतीय युद्ध शकापूर्वी ३१७९ वर्षे झालें असें मानतो. आणि वराहमिहिराला च तें न मानण्याला कारण काय ? वस्तुतः कारण तर कांहीएक दिसत नाहीं. ह्यावर कोणी अशी व्यप्ति काढतात की, वराहमिहिराच्या वेळीं व वृद्धगर्गाच्या वेळी भारती युद्धाच्या कालासंबधानें दोन परपरा असाव्या किंवा असल्या पाहिजेत. परंतु गर्ग आणि वराहमिहिर ह्यांच्या पूर्वी अशी एखादी परंपरा होती, असें म्हणण्याला गर्गवराहांखेरीज दुसऱ्या कोणाचें प्रमाण नाही. [३० तेव्हां, अशी द्विविध परंपरा होती, असें निःशंक विधान करण्यास मन धजत नाहीं. तेव्हा गर्गवराहोक्त भारतीय युद्धाचा २५२६ हा शकपूर्व काल संशयित आहे असें

